

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका





# दीपावली

तिसरा संगीत विशेषांक

जून १९६८

वर्ष २४ वें

मूल्य २ रु.

अनुक्रमणिका



वर्ष २४ वे • जून ६८ • मूल्य २ रु.

तिसरा संगीत विशेषांक

# दीपावली

## श्रेयनामावली–

• **सूर के सम्राट–बडे गुलाम अली खाँ**–गानतपस्विनी **अजनीबाई मालपेकर** यांच्या शब्दांत • **खंडिता**...'मी स्वर गोळा करतो, तू फुलं गोळा कर'–**प्रा. अशोक रानडे** • **लतेचे गाणे**... गाता रहे मेरा दिल...–**वामन इंगळे** • **याद**...वाजिद...कशाला आता त्या आठवणी ? ! –**अरविंद मुळगांवकर** • **संगीताचे माहेर**...महाराष्ट्र ? याही बाबतीत आत्मविस्मृती ! ! –**कै. ग. ह. रानडे** • **हिरवी माडी, काळी स्वप्ने**...काळे ढग दाटले आहेत...सारंच कोसळणार आहे–**अशोक गोखले** • **क्षण...एक पुरे**... पण तो उगविण्यासाठी केवढी तपश्चर्या !–**सौ. निर्मला मोने**

• **पहिली पाउले** महाराष्ट्राच्या पाच सुस्वर कन्यांची संगीतातील पहिली पाउले–**माणिक वर्मा, प्रभा अत्रे, सुहासिनी मुळगांवकर, शोभा गुर्टू, लक्ष्मी शंकर**

• **असे होते भोबे**–रसिक जीवनाची रसिकश्रेष्ठींनी दिलेली दाद...**भोबे.–पु. भा. भावे** • **चतुरस्त्र कलावंत भोबे–मं. वि. राजाध्यक्ष** • **समरसही जीवन–दा. गो. देशपांडे** • **आंब्याला मोहोर तसा भोब्याला गहिवर–रवींद्र पिंगे** • **पुष्कळ दिले पण, घेतले मात्र काही नाही–डॉ. मा. धुं. फळणीकर** • **भोबे–गो. नी. दांडेकर** • तसेच सानथोरांनी घडविलेले भोबे यांचे **पत्ररूप दर्शन** ... व **'धन्य ते गायनी कळा' गोपाळकृष्ण भोबे** लिखित स्वरसम्राट तानसेनच्या जीवनावरील नाटकाची एक झलक. शिवाय–

• **स्वर मंडळे...मैफिलीतील पानसुपारी –प्रा. अशोक रानडे** • **इंद्रधनुष्य– ज्ञानेश्वर नाडकर्णी** • **दीपमाला–सारस्वत** • **ऐसी अक्षरे रसिके मेळवीन...–आनंद साधले** आणि **प्रा. वि. द. संत.**

Gram: Dalalart
टे. नं. ३५७७६५

★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु. + रजि. पोस्ट ८० पैसे वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42 Kennedy Bridge, Bombay-4.




## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६.

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याचे** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# हे तर "गाण्याचे गाणे"

संगीताला नादब्रह्म म्हटलं आहे. त्याचे नाते खुद्द ब्रह्माशी–म्हणजेच सृष्टीच्या निर्मात्याशी जोडलेले आहे. संगीताने माणसालाच उन्मनी अवस्था प्राप्त होते असे नव्हे तर वनस्पतींना वाचा फुटते, नवे धुमारे फुटतात, नवे जीवन प्राप्त होते असेही शास्त्रीय शोधांनी सिद्ध केले आहे. जीवनाशी संगीताचे नाते जवळचे आहे हे जाणूनच माणसे म्हणतात, "गाऊ दे त्याला. आताच तर कुठे त्याला सूर सापडला आहे. लय साधली आहे. ताल गवसला आहे. हवा असलेला 'नाद' त्याला सापडला आहे." शब्द कळले नाहीत तरी सूर कळतात. हृदयाला भिडतात. किमया करून जातात. सूरांचा शत्रू असलेला औरंगझेब एखादाच. आणि म्हणूनच 'तो औरंगझेब आहे' अशी म्हण रूढ होऊ शकते. पण सर्वसाधारण माणूस मात्र सूरवेडा असतो. तो जाणकार नसेलही. पण त्याला राग, ताल न कळले तरी सूर कळतात–कारण सूरांचे नाते असते अखेर हृदयाशी. अंगाईपासूनच त्याचा सूरांशी संबंध येतो. आणि हे नाते जाणून माणसे सूरांशी संगत करतात. एखादा कवि मग "गाण्याचे गाणे" गातो, दुसरा "सतारीचे बोल" ऐकवितो. जीवनातले सूर सरले की माणसातला असुर जागा होतो. त्याच्या हृदयातली वीणा मूक होते. मनात फुललेले गुलाबचंपक गळून पडतात. आजच्या परिभाषेत तो अगदी "मॅटर ऑफ फॅक्ट" माणूस होतो. मग मधूनच एखादा काकाजी येतो. म्हणतो, "दाद द्या यार! काय तंबोरे मस्त लागले आहेत."

अखेर ह्या साऱ्या कला जीवन समृद्ध, सह्य व मंगलतर करण्यासाठीच जन्म पावल्या आहेत अशी आमची श्रद्धा आहे. कला सरल्या आणि क्रीडा संपली की उरतो फक्त देह! 'दीपावली'ला शब्द, सूर, क्रीडा, रंग, रेखा ह्या साऱ्या माध्यमांतून अखेर ब्रह्मस्वरूपाच्या जवळ जाणाऱ्या माणसाची सेवा साधायची आहे. म्हणून दीपावली क्रिकेट अंक, संगीत अंक, कथा अंक, सेना अंक, नौदल विशेषांक, एव्हरेस्ट गौरव अंकादि उपक्रम सादर करीत आली आहे. समृद्ध व प्रगमनशील मानव समाज हे 'दीपावलीचे' स्वप्न आहे.

संगीत अंकाची पद्धत 'दीपावलीने' १९६६ साली सुरू केली. तेव्हा तो उपक्रम सर्वस्वी नवा होता. परंतु 'दीपावली'चा हा तिसरा संगीत विशेषांक आहे. आम्हांस असा अभिमान वाटतो की, संगीत अंकाचा हा उपक्रम आता नुसताच स्थिरावला नाही; तर त्याला काही 'गती' आली आहे. वजन आले आहे. बड्याबड्यांची 'दाद' मिळू लागलेली आहे. नवे नवे नातेसंबंध जुळून आले आहेत. संगीत क्षेत्रातले मानकरी 'दीपावली'च्या संगीत (वार्षिक) मैफलीत साभिमान व सकौतुक येऊन बसले आहेत.

"सूर के सम्राट" मरहूम बडे गुलाम अल्ली यांचा पैगंबरवास साऱ्याच संगीत शौकीनांना व्याकुळ करून गेला. सुविख्यात गायिका अंजनीबाई मालपेकर यांचा गुलामअल्लींवरचा लेख ही एक अत्यंत दुर्मिळ अशी 'चीज' आम्ही ह्या मैफलीत पेश केली आहे (दुर्मिळ फोटोसह). "यशासारखं यशस्वी काही नसतं" असं म्हणतात. पण केव्हातरी त्याचा 'श्रीगणेशा' प्रत्येक क्षेत्रात गिरवावा लागतोच. संगीताच्या क्षेत्रातल्या आजच्या आघाडीवरच्या 'पंचकन्या' श्रीमती माणिक वर्मा, सुहासिनी मुळगांवकर, लक्ष्मी शंकर, शोभा गुर्टू व प्रभा अत्रे ह्या आपल्या 'पहिल्या मैफली'च्या सुरस (पण चमत्कारिक नव्हेत) कथा ह्या अंकात प्रथमच सांगत आहेत. हा 'सूरसंवाद' श्री. रवींद्र पिंगे आणि सौ. निर्मला मोने यांच्या चिकाटीमुळे यशस्वी झाला. कथांचाही सूर चांगला लागला आहे. तुम्हीही दाद द्याल.

ह्या संगीत अंकाला गोपाळकृष्ण भोबे यांची 'साथ' नाही. पण 'सोबत' आहे. 'भोबे पुरवणीत' पानोपानी भोबे यांची विविध दर्शने आहेत. घडवणारे आहेत मातबर लेखक– पु. भा. भावे, प्रा. मं. वि. राज्याध्यक्ष, दा. गो. देशपांडे, रवीन्द्र पिंगे– सारीच नावे सांगत नाही. तुम्ही वाचा आणि दाद द्या.

सूरासूरात न्हाऊन निघालेला हा तिसरा संगीत विशेषांक समोर ठेवून आम्ही षड्ज लावला आहे. बैठक रंगू द्या मंडळी!!

—संपादक









# सूर के सम्राट

## खाँसाहेब बडे गुलाम अली

—अंजनीबाई मालपेकर

**मला** रोज रात्री १२-३० नंतर झोप लागते. तोपर्यंत मी माझा एकुलता एक मुलगा बाबा आणि सूनबाईबरोबर गप्पा मारीत बसते.

मंगळवार दिनांक २३ रोजी रात्री ११-३० वाजता नभोवाणीवरून एक दुःखद वार्ता माझ्या मुलाने ऐकली पण ती त्याने मला तेव्हा सांगितलीच नाही.

दुसऱ्या दिवशी मला माझ्या नातवंडांनी वर्तमानपत्रे वाचून दाखविली तेव्हा मला समजले की, खाँसाहेब बडे गुलाम अली पैगंबरवासी झाले. ते ऐकताच माझ्या कुटुंबातीलच एखादी निकटची व्यक्ती गेल्याचं दुःख मला झालं. नकळत दोनचार अश्रू माझ्या नेत्रावाटे ओघळले आणि वृत्तपत्राचे वाचन करणारा माझा नातू आजी असं काय करते म्हणून टकमक मजकडे पहातच राहिला. निधन समयी खाँसाहेबांचे वय ६६ वर्षांचे होते असं म्हणतात पण ते निश्चित किती वर्षांचे होते हे खुदाच जाणे. कारण मुसलमानांमधे जन्मपत्रिकाच मुळात केलेल्या नसतात.

बडे गुलाम अल्ली मूळचे पंजाबातले. पंजाबातून ते कराचीला जाऊन राहिले. कालांतराने ते मुंबापुरीत येऊन स्थायिक झाले. त्यांच्या मुंबई आगमनाची कहाणी तर मोठी गमतीची आहे. त्याकाळी मुंबईत 'बॉम्बे क्रॉनिकल' या नावाचे एक इंग्रजी दैनिक निघत असे. त्याचे एक संपादक होते त्यांचं नाव नौरोजी बेलगामवाला. त्यांची व आमची चांगली ओळख होती कारण ते मोठे संगीत शौकीन होते. एकदा बेलगामवाला कराचीला गेले. तिथे त्यांनी बडे गुलाम अलींची बैठक ऐकली व त्यांना माझ्याबद्दल खूप खूप सांगितले. मी त्यावेळी महाराष्ट्रातील एक प्रख्यात गायिका होते व ज्याच्या त्याच्या तोंडी माझे नाव असायचेच. बेलगामवाल्यांच्या प्रभावी बोलण्याचा खाँसाहेबांवर सुपरिणाम झाला व ते केवळ माझे गाणे ऐकण्यासाठी म्हणून मुंबईस आले. माझे पती कै. श्री. भवानजी वेद यांचेशी त्यांचे स्नेहाचे संबंध होते.

मुंबईत आमच्या केनेडी ब्रीजजवळच्या 'नारायण आश्रम' या रहात्या निवासस्थानी खाँसाहेबांच्या एकंदर पाच बैठकी गाजल्या.



अनुक्रमणिका

**खाँसाहेब बडे गुलाम अली नुकतेच पैगंबरवासी झाले. खाँसाहेब भारताच्या सुविख्यात गायिका श्रीमती अंजनीबाई मालपेकर यांना खूप मान देत असत. त्यांच्याच आशीर्वादाने ते मोठमोठ्या संगीत बैठकीतून गायिले नि बाहदुरी मिळविली खाँसाहेबांच्या निधनाने ८६ वर्षांच्या अंजनीबाई दुःखातिशयाने व्याकुळ झाल्या. खाँसाहेबांच्या विषयीच्या त्यांच्या स्मरणात असलेल्या काही रंजक आठवणी....**

एका बैठकीला तर बॅ. मुकुंदराव जयकर, सर तेजबहादूर सप्रू, पेरीन बेन कॅप्टन व सर डोसाभाई भिवंडीवाला ही तत्कालीन मुंबईतील बडी मंडळी उपस्थित होती. या पाचही बैठकींसाठी सारा सारा खर्च नौरोजी बेलगामवाला यांनी केला. मी खाँसाहेबांचे गाणे ऐकले व खाँसाहेबांनीही माझे गाणे ऐकले पण विशेषतः माझे गाणे ऐकून खाँसाहेब मला गुरुस्थानी मानू लागले. कितीतरी रागदारींच्या चिजांबद्दलची माहिती त्यांनी मजजवळून समजावून घेतली. 'माँ' किंवा 'मैय्या' या नावानेच ते मला हाक मारीत असत. वरील पाच बैठकी व्यतिरिक्त अनेकदा खाँसाहेब माझ्या घरी आले होते. सकाळी जर ते आले तर दुपारी तीन वाजेपर्यंत ते आपले गातच बसत आणि दुपारी जर आले तर मध्यरात्रीपर्यंत आपले गातच बसायचे. गाण्यात ते इतके तल्लीन होऊन जात की अखेर शेवटी त्यांना हालवून उठवून जागे करावे लागे व मगच ते जागचे हालत. खाँसाहेब मुंबईच्या विक्रम संगीत परिषदेत १९४४ साली खूप प्रसिद्धीस आले. त्यांची ठुमरी विशेष प्रसिद्ध आहे. त्यांच्या पंजाबी हरकती फारच कौशल्यपूर्ण व प्रभावी होत्या. मध्यलयीतील त्रिताल चिजा गाताना व एकतालातील चिजा गाताना ते तानांच्या ज्या फेकी घेत त्या तलवारीच्या कुशल हातासारख्या चमकदार-धारदार वाटत असत. खरोखरच ते सूरांचा बादशहा होते. त्यांचा भाऊ बरकत अली हासुद्धा चांगला गात असे व तो गायकी त्यांचेकडेच शिकला. खाँसाहेबांचा मुलगा मुन्वर हा पण बरा गातो. खाँसाहेबांच्या निधनाने संगीत सृष्टीतला एक देदीप्यमान तारा कायमचा अस्तंगत झाला आहे. ज्याप्रमाणे आपण भिंतीत खिळा ठोकतो त्याप्रमाणे त्यांनी सूर गळ्यात घट्ट मारून ठेवलेला होता की काय नकळे. ते ख्याल उत्तम गात, धृपद धमार तर उत्कृष्टच आणि ठुमरी तर काय वाहवाच! कवालीही ते झक्क गात. संगीतातले ते जणू पंडितच होते. ते 'हरिओम तत्सत्' हे भजन तर तीनतीन तास गात बसत असत व श्रोतेही त्यांचे समोरून कंटाळून कधी उठत नसत इतकी दमदार गायकी त्यांची होती. 'आये न बालम' ही ठुमरी तर प्रसिद्धच आहे. त्यांच्या गायकीवर खूष होऊन बनारसच्या विख्यात गायिका सिद्धेश्वरीदेवी यांनी त्यांना आपल्या बोटातली हिऱ्याची आंगठी बहाल केली होती.

ज्याप्रमाणे माझ्या आवाजावर कुणी दुष्टाने कुप्रयोग केला होता त्याप्रमाणे खाँसाहेबांच्या आवाजावरही कुप्रयोग करण्यात आला होता. काही काळाने त्यांना एक साधू भेटला त्या साधूने केलेल्या उपायामुळे त्यांना चारपाच दिवस उलट्या झाल्या व त्यातून लोखंडाचे कण पडले होते. खाँसाहेबांच्या भर जवानीतली ही गोष्ट होय.

खाँसाहेब शरीराने लठ्ठंभारती व आकाराने ठेंगू होते. ते स्वभावाने मोठे विनोदी होते. विनोदी गोष्टी सांगण्यात ते मोठे कुशल. पण गंमत अशी की विनोदी कथा सांगताना ते स्वतः कधीच हसत नसत तर दुसऱ्यांना खदखदून हसवून सोडीत असत.

खाँसाहेबांचे खाणेही तसेच होते. दहा शेरांची बासुंदी केली तर वाटगा वाटगा भरून ते पीत असत. अगदी एका बैठकीत. ते मांसाशनही करीत. रोज कोंबडी खात. कोंबडीचे जर एक शेर मांस पडले तर दोन शेर तूप त्यात ओतत व त्या कोंबडीच्या मटणात बदाम पिस्ते घालीत असत. ते कधी एकटे जेवले नाहीत. १०–१५ माणसे त्यांच्याबरोबर जेवायला बसत असत. कुणाकडे जेवायला जरी ते गेले तरी त्यांच्याबरोबर सात-आठ माणसे असायचीच. त्यांचा महिन्याचा खर्च चार हजार रुपये असायचा. ते मदिराही प्राशन करीत. पान खात आणि विडी ओढत असत. ते कर्णासारखे उदार होते. भिकाऱ्यांना त्यांनी उदारहस्ते भिक्षादान केले आहे.

हिंदू पोषाख करण्याची त्यांना भारी आवड होती. धोतर, सदरा, उपरणे घालून हिंडणे-फिरणे त्यांना आवडायचे. उंची अत्तराचे ते मोठे षौकी होते. ऋतुमानाप्रमाणे ते अत्तरे निवडीत असत. वसंतऋतूत ते खस अत्तर प्रामुख्याने वापरीत. त्यांनी कधी कुणाला वाईट म्हटले नाही. निंदा नालस्ती कुणाची केली नही. मुलांचे ते मोठे षौकीन होते. मालकंस हा त्यांचा प्रिय राग होता.

खाँसाहेबांना अर्धांगवायूचा पहिला झटका जेव्हा आला तेव्हा त्यांना सेंट जॉर्जेस इस्पितळात ठेवण्यात आले होते. तेव्हा त्यांना पाहाण्यासाठी मी स्वतः गेले होते. पण आश्चर्याची गोष्ट अशी की, मला बघून त्यांनी विचारले, "मी आता गाऊ का?" आणि मी काही उत्तर द्यायच्या आतच ते खरोखरच गाऊ लागले. शेवटी तोंडात बोटे घालून त्यांचे तोंड बंद करण्यात आले. डॉ. बालिगांनी त्यांच्या मानेवर शस्त्रक्रीया केली होती. ती उरकल्यावर ते जेव्हा शुद्धीवर आले तेव्हा म्हणाले, मी आता गाऊ का? आहे की नाही या गायकाची मजा! भारतात पुरुष गायकांत बडे गुलाम अली व स्त्री गायिकांत लखनौच्या बेगम अख्तरी हेच प्रसिद्ध संगीत कलाकार होत असं माझं मत आहे.

●●●









याद........

# ............याद
# याद............
# ......याद



**फटफटीत** उजाडलंय पण सूर्य उगवण्याची काहीच चिन्हं दिसत नाहीत. गडद घूसर ढगांनी आभाळ झाकोळलंय. वारा रेती उडवीत सुसाटलाय. सतलज खळखळत वाहतेय. सहाणवाल्याचा लहानगा अब्दुल नुकताच प्रार्तविधी आटोपून तांब्या वाळूने घासत बसलाय. मधूनच हात झाडतोय राग लागल्यावर. डोळचात गेलेली रेती कष्टाने निवारतोय. इतक्यात त्याचं लक्ष दूरवर पाण्यात तरंगणाऱ्या एका अस्पष्ट वस्तूकडे जातं. तांब्या तसाच टाकून तो किंचित् पुढे धावतो. पिंढऱ्याइतपत पाण्यात आवेगाने शिरतो. डोळे ताणून पाहू लागतो. तो एक तबला आहे. प्रवाहाच्या ओघाने तो लाटांवर हेलकावतोय. त्याची वर्तुळाकार शाई मधूनच दृष्टीस पडतेय. अब्दुलला एवढं माहीत आहे की हा एक हाताने वाजवायचा बाजा आहे. आनंदातिशयाने उडी मारून तो पुढे सरकतो. "अगर पानी में जायेगा तो हड्डी-फसलियाँ नरम कर दूंगी." अम्मीने दिलेली सक्त ताकीद. तो मागे सरकतो. त्याची मासूम नजर इकडे तिकडे भिरभिरते. दूरवर एक मछेरा आपलं जाळं नि टोपली सांभाळीत चाललाय. त्याच्या ओल्या पिंढऱ्यांवर चिकटलेली रेती पहात अब्दुल त्याच्याजवळ येतो. मछेरदादाला विनवण्या करू लागतो. तसा भारी लाघवी आहे हा अब्दुल. अखेरीस मछेरा कुतुहलानेच पाण्यात उतरतो. चारपाच हातातच ती वस्तू त्याच्या हाताला लागते. तो ती जवळ ओढतो आणि..... एका झटक्यात हात बाजूला करतो. पुन्हा हात मारत रिकाम्या हातांनीच किनाऱ्याला येतो. त्याचा चेहरा भीतीने पांढरा पडलाय. 'तोबा, तोबा!' म्हणून कानफटात मारून घेतोय. छोटा अब्दुल अनाडचासारखा पहात राहिलाय "चल, चल मेरेसाय पटेलसाहब के पास." अब्दुलच्या बखोटीला धरून तो जवळजवळ खेचतोच. "मैं नहीं आऊँगा दरोगासाबके पास" अब्दुल रडकुंडीला येऊन म्हणतो. "अरे, तुझे क्या वो खायेगा? चल, वेटे चल, तुझे वापीस घर पहुँचा दुंगा, बस्!"....किंचित् पुढे गेल्यावर अब्दुलला आपल्या तांब्याची आठवण येते. पुन: धावतच तो मागे येतो. तांब्या उचलतो आणि मछेऱ्याबरोबर पटेलकडे निघतो.

**

सूर्य आता चांगलाच वर आलाय. वाळू कोमट तापलीय. वारा पडलाय. सतलज मात्र अखंड खळखळतेय. पटेल आपल्या दोनतीन शिपायांना घेऊन मछेऱ्याबरोबर तेथे आलाय. बाजूलाच अब्दुल घाबराघुबरा उभारलाय. तो बाजा आता आपल्याला मिळत नाही हे त्याला कळून चुकलंय. तरीपण अजूनही अंधुक आशा वाटतेय. पटेलच्या हुकुमानुसार दोन शिपाई मछेऱ्याबरोबर पाण्यात उतरतात. ते खेचत खेचत किनाऱ्यावर आणतात. वसकन् घाण येते. अब्दुल नाक दाबून कुतुहलाने पाहू लागतो. ते एक प्रेत आहे. मऊ झालेल्या चामडयाच्या वादीचा एक वेढा त्याच्या गळचाला पडलेला आहे. बाजूलाच पाणी आत शिरल्यामुळे जड झालेला



अनुक्रमणिका

बायाँ ओल्या वाळूत रुतून बसला आहे. त्याचा उजवा पंजा तबल्याच्या वादीत गुरफटलाय. गळचाला बसलेल्या फासामुळे बुबुळं किंचित् बाहेरं डोकावताहेत. चेहऱ्यावर पश्चात्तापाचा नि असह्य दुःखाचा संमिश्र भाव स्पष्ट दिसतोय. पाण्याने थवथवलेला कुडता अंगाला चिकटून बसलाय. एक शिपाई त्याचं टोक पिळतो आणि वर ओढून तो भयानक चेहरा झाकतो. "हाय अल्लाह."......तिघे चौघे एकाचवेळी सुस्कारतात. "जाओ, वो सारंगीवालेको—वाजिद-अलीको बुलाओ. जल्दबाज़ीसे"—पटेल एका शिपायाला फर्मावतो.

★★

दार वाजतं. वाजिदअली डोळे चोळत चोळत उठतो. रात्र-भराच्या जागरणाने त्याचे डोळे चुरचुरतायत. अंग मोडून आलंय. कणकणल्यासारखं वाटतंय. चरवीभर दूध घेऊन ठेवल्यावर पुनः निवांतपणे ताणून द्यायच्या विचारात तो आहे. सैल झालेली तेह-मत घट्ट करीत तो अंथरुणावर यंत्रवत् पडतो नि त्याला अन्वर-मियाँची याद येते. अन्वरचा तर अख्ख्या प्रवासाचा शीण. तो खूपच थकलेला असणार. वाजिदचं मित्रप्रेम त्याला तिथे पडू देत नाही. तो पुनः उठतो. स्टोव्ह पेटवून ॲल्युमिनियमच्या काळचा-पांढ्या भांड्यात चहाचं आधण ठेवतो. मिश्री काढून हातावर घेतो. मिश्रीच्या बाटलीशेजारीच दुसरीही एक बाटली आहे—मौलानाने दिलेली मालीशच्या तेलाची. त्याच्या डोक्यात एक

## —अरविंद मुळगांवकर

कल्पना येते. अन्वरमियाँचा सीना या तेलाने रगडून देण्याची. त्याच्या मनाचा नाही तर शरीराचा तरी थकवा दूर करता येईल. मिश्री लावत लावत तो सज्जात येतो......."हाय अल्लाह! ये क्या हुआ? हा कुठं गायब झाला? बाडबिस्तरा वगैरे गुंडाळून ठेवून? दायाँबायाँची जोडी पण कुठे दिसत नाही. काय अवलिया आहे? अरे! हा पळून तर नाही गेला? जिवाचं काही बरंवाईट.. आत्महत्या?"......त्याच्या कपाळाला घाम फुटतो. कसातरी तो चूळ भरतो—स्टोव्ह मालवतो आणि तडक पटेलच्या—दरोगा-साहबच्या चावडीचा रस्ता धरतो. त्याची झोप आता पार पळालीय.

★★

भिंतीतील लाकडी फळयावर मारलेल्या खिळचांना दोन अवजड बंदुका लावलेल्या आहेत. बाजूलाच दोन लोखंडी बेडचा लटकताहेत. खिडकीजवळ उभ्या केलेल्या कपाटावरील काचेवर दहाबारा गुन्हेगारांचे समोरचे व बाजूचे फोटो आतून लावून ठेवलेले आहेत. त्यातील प्रत्येकाच्या दाढचा खुरटचा गवतासारख्या वाढल्या आहेत. एका प्रचंड टेबलाला लागून ठेवलेल्या जुन्या फिरत्या खुर्चीत दरोगासाहब पेन्सिल उलटचा बाजूनं कुरतडत बसले आहेत.

"बोलिये, खाँसाहब, शुरुसे आखरीतक." झोके घेत दरोगा-

**गफलती या सगळीकडेच होतात. पण पाण्यात तरंगत असलेलं प्रेत हे अन्वरचंच की आणखीन् कुणाचं हे घडपणे ओळखता न आल्यानं बिचाऱ्या सयिदा बेगमला प्राणाला मुकावं लागलं. अन् अखेर अन्वरचीही अक्ष-रशः वेड्यासारखी अवस्था झाली. तबलेनवाज अन्वरची ही दर्दभरी कहाणी....**

साहेब बोलताहेत. बोलता बोलता खुर्ची मागे अधांतरी झोकून पेन्सिलीचं टोक टेबलाच्या कडेवर टेकण्याची त्यांची लकब फार पुरानी आहे. "मैं ये अन्वर हुसेनको अच्छी तरहसे जानता हूँ. बडा अच्छा कलाकार था......" आपण एखादा शेरा मारल्या-नंतर दुसऱ्याची प्रतिक्रिया अजमावताना ते मान किंचित् मागे झुकवून आपल्या भरघोस मिशांच्या फटीमधून दुसऱ्याकडे पाहतात. "..... आठ दस बरस गुजर गये होंगे. हमारी कोठीमें—कौन वह बाई? हाँ. मुमताजबाई का जलसा हुआ था. अरे? आपही तो थे सारंगीकी संगतपे? हाँ. तो ये अन्वरमियाँने ऐसा लाजवाब तबला बजाया की बेहद! अभी अभीतक कानमें गूँज रहा है. मैं तो इनको खूब मानता हूँ भैय्या! और क्या शराफ़त थी ये आदमीकी! वाह वा. क्या हुआ क्या इनको? इतने जल्दही उपरवाले के पास चल बसे?" — "अरे कौन है उधर? इस कलमदान में स्याहीतो रख्खा करो—हरामज़ादे क्या काम करते है पता नहीं—अच्छा तो वाजिदभाई, आप बताते रहिये. मैं ये इस्टेटमेंट पूरा कर देता हूँ."

"मुआफ करना पटेलसाहब. ये दुख मुझसे सह नहीं सकता. कुछ बातें करनेमें मेरा दिल बिल्कूल नहीं लगता. दरोगासाहब, इतनी बात मान लीजियेगा. मुझे अब इजाज़त दीजिये. नहीं तो चलिये मेरे साथ मुमताजबाईके घर. वहाँ आपको सबकुछ मालूमात हो जायेंगी."

★★

दिलावर चौक तसा स्वच्छ ठेवलेला आहे. वरचेवर गझल कव्वाल्यांच्या मेहफिली झडत असतात. तिथली तरुण मंडळी नेहमी त्योहारांवर नजर ठेवून असते. मग तो मुसलमानांचा असो वा हिंदूंचा. मुहर्रमला जशा कव्वाल्या रंगतात तशाच होळीलाही. ते एकमेकात एवढे मिसळून गेले आहेत की ठाकूरच्या चंदुसिंगला 'ए चाँदखाँ' म्हणून जरी पुकारलं तरी तो ओ देईल. दिवाळीला सर्व मुसलमान आपल्या पोरांबरोबर जातीने दारू उडवतील आणि मिठाई खातील. तसेच बकरीदला झाकलेल्या ताटातलं गोश आपल्या हिंदु शेजाऱ्याला पाठवण्यास विसरणार नाहीत. दिलावर चौकातच तबस्सुम मंझिल आहे. तशी तर जुनाट दोनखणी इमा-रत. खालीच असलेल्या राज तेलाच्या दुकानात झुंबड उडालेली आहे. "सबको मिलेगा भाई, सबको मिलेगा—पहले एक कतारमें






खडे हो जाइएगा." — तेलवाला मेटाकुटीला येऊन समजावतो आहे. जवळच 'राज' तेलाचे डबे एकावर एक रचून ठेवलेली चार भक्कम रबरी धावांची गाडी उभी आहे. तिचा आळसावलेला उंट निर्विकारपणे अर्धवट डोळे मिटून रवंथ करतोय. वर माडीकडून अत्यंत मधूर पण किंचित् करुण असे स्वर ऐकू येताहेत–

" . . . .करो हम सफीरों मदीनेकी बातें. . . ."

मुमताजवाई एका शिष्येला "नात" शिकवण्यात मश्गुल झाल्या आहेत. अमजाद सारंगिया 'सफीरों' नंतरची हरकत सही-सही काढण्याच्या प्रयत्नात आहे.

"सलाम आलेकूम—सलाम आलेकूम". . . . .

"अ ऽऽ आलेकूम सलाम."

ढळलेला पदर डोक्यावरून सावरीत मुमताजवाई तंद्रीतून जाग्या होत उद्गारतात.

"आइये तशरीफ़ लाइये–दरोगासाहब. कैसे आना हुआ. मिज़ाज कैसी है? अरे वाजिद तुम्हारा मुह इतना सूख कैसे गया?—तबियत तो खराब नहीं?"

"सबकुछ बताता हूँ माँ. सबकुछ बताता हूँ. पहले ये साज़ रख देना जगेपे. माँ, आज अन्वर चल बसा. आपहत्या कर ली उसने."

"परवरदिगार, ये मैं क्या सुन रही हूँ? अगर. . . . .वो था कहाँ?"

"कलही शाम लौट आया मेरे घर. विलासपूर था सात बरस. मियाँ शलारीखाँसाहब ठहरे ये वहाँ—उनके पास तबला याद करता रहा."

"इतना बेमुरव्वत!—घरपे क्यूँ नहीं बताया—वो बेचारी सयिदा तड़पती तड़पती मर गयी. तोबा. तोबा!" डोळे पुसता पुसता मुमताजवाईंचा पदर भिजून जातो.

"माँ, दरोगासाहबको अन्वरका और सयिदाभाभीका दर्द-भरा किस्सा शुरूसे सुनना है माँ—उनकी बडेसाहबको पूरी कागज़ात जल्दहीसे भेज देनी है."

★★

तीस बत्तीस वर्षं झाली असतील. दिल्लीचे मशहूर तबला-नवाझ उस्ताद बुगराखाँसाहब इथे आले होते. त्यांच्याबरोबर सहा-सात वर्षांचा एक चुणचुणीत मुलगा होता. तोच हा अन्वर.



खाँसाहब हाजला निघाले आणि त्यांनी अन्वरला माझ्याकडेच सोडलं. म्हणाले—"अच्छे खानदानका ये लडका है. मैंने अभी अभीतक पाला था. अब मैं तो हाज जा रहा हूँ. लौटूंगा तो इसे ले जाऊँगा. लेकिन मेरी ख्वाइश तो ये है कि वहाँही परवर-दिगारके पास चला जाऊँ." त्यांच्या म्हणण्याप्रमाणेच झालं. ते काही परत आलेच नाहीत. अन्वरला मीच लहानाचा मोठा केला. इथे कालेखाँसाहेबांचा गंडा त्याला बांधून दिला. दिमाख इतका चांगला की कुठलीही गतपरन, कायदा याद करायला सांगा यूँ तैय्यार. रियाझ इतका करायचा की तोबा तोबा! खान्यासाठी पुकारलं तरी ह्याचं ध्यान दुसरीकडेच. हातात तबला तरी असा-यचा नाहीतर हातातोंडाने मात्रांची गिन्ती तरी चाललेली असा-यची. माझ्यावर भारी प्रेम. खाँसाहबांनी शाबासकी दिली की प्रथम मला येऊन सांगायचा. . . . . ."माँ, आज खाँसाहबने मेरे हत्ते चूम लिये." मी विचारलं, "क्यूँ"?—"कहने लगे, बेटे, ये हत्ते तेरे नहीं बल्कन खुदाके हैं". . . .मी अभिमानानं फुलून यायची. अन्वर लौकरच तैय्यार झाला. मियाँ कालेखाँ त्याला निरनिराळ्या मेहफलीमध्ये वाजवू लागले. स्वत:बरोबर गावोगावी भरणाऱ्या मेळ्यांना नेऊ लागले. ते नेहमी त्याला म्हणत, "बेटे, सिखाना ये उस्तादका काम है, लेकिन् सीखना, सुनना, परखना और बजाना ये असली शागीर्दोंका काम है—इसिलिये मैं तुझे संग लेके घुमता हूँ."

अशी बरीच वर्षं गेली. रोज रात्री हा माझ्याबरोबर तब-ल्याची संगत करीत असे. गझल–ठुमरीची दुगन लागली की मी तृप्त मनाने ह्याने वाजवलेली लग्गी ऐकत बसत असे. कधी कंटाळा म्हणून यायचा नाही. रोज नवं नवं ऐकायला मिळायचं. तबल्या-बायाँवरचे त्याचे हात इतके मिठ्ठास होते की क्या कहने!

अतिशय भावनाप्रधान नि तितकाच दिलदार. ह्या वाजिदची नि ह्याची जानपहेचान झाली ना तो किस्सा तर ऐकण्यासारखा आहे. "वाजिद, बेटे, तूही सुनाओ" . . . . . . . .

★★

माझी म्हातारी आई हाजजवळ पोचून चारपाच दिवस झाले असतील नसतील. एक तार हाजहून आली. "माँ बीमार हो गयी है–तुरन्त आ जाना. हाज़ पहुँचनेकी उनकी खूब ख्वाइश है।"

मी तर माझ्याजवळचे सर्व पैसे खर्च करून बसलो होतो. सगळे आईच्याच प्रवासखर्चात संपले होते. मुंबईलाच जायला पैसे नव्हते तर हाज दूरच. मी अतिशय विकल मनस्थितीत होतो. माझ्या मनावरचा ताण तंबाखूच्या पानाने कमी झाला असता. माझे पाय पानवाल्याकडे वळले. मी पान मागितलं. पापण्यांचा अड-थळा झुगारून देऊन माझे अश्रू बाहेर पडू पाहत होते. आणि ते शब्द माझ्या कानावर आले. . . . ."अच्छी बात! सारंगी बजाते हो" एक राजबिंडा जवान माझ्या काखेतल्या सारंगीकडे पाहून विचारत होता. . . . ."आँ! ये क्या? आप रो रहे है? बडी अजिब बात है" आणि माझ्या दंडाला धरून त्याने मला दूर

(पृष्ठ ६४ वर)


सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.
परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून वेचत रहाण्याचे आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.
'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान प्राप्त होण्यापूर्वी—
एका छोटया शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ...२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तज्ज्ञांचा सखोल अभ्यास...मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि या सर्वांपेक्षा अधिक म्हणजे मनातील जिद्द.
साहजीकच आमच्या रबरी उत्पादनांचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.
'स्वस्तिक'ची काही रबरी उत्पादने—
होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, ॲडीसीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॉबॅट शूज् व इतर विविध पादत्राणे.
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड, खडकी, पुणे-३.








—अशोक रानडे

# खं डि ता

"**टिळक** स्वतःहून भेटायला आले म्हणजे काय लहानसहान गोष्ट आहे! प्रजाजनापुढं राजानं पायउतार होऊन जावं तोच प्रकार. पण वैद्यराजांचा प्रभावच तसा. खेळण्यातल्या डबीत डबी असावी तसं वैद्यराज संस्थानातलं संस्थान होतं. केवढा गुण, केवढा वाडा आणि कोण लोकसंग्रह. त्यात आणि रामशास्त्र्यासारखी निःस्पृह वृत्ति. XX पूरच्या राजानं गुर्मीनं बोलावणं पाठवलं तर मान सुद्धा न वळवतां वैद्यराजांनी परत उत्तर पाठवलं होतं "राजा असशील तर तुझ्या घरचा . . . औषध हवं असेल तर इथं यावं लागेल." अप्पा सगळं सांगत होता आणि दहा वर्षाची मथी लिंबाएवढे डोळे करून ऐकत होती. हे सगळं अकराव्यांदा ऐकत होती ती. पण हे सांगत असला की अप्पा रागवायला विसरे! म्हणून मथीनं हुंदडताना परकर टरकावला असला की आप्पाला ती साळसूदपणे म्हणे "अप्पा, टिळकांची गोष्ट सांगा ना." अप्पाला तेवढं पुरे होई.

अप्पा दोन गोष्टी करताना अगदी रंगून जाई. अगदी इतका रंगे की पहाणाऱ्याच्या सुद्धा सहज लक्षात येई. सांभारे वैद्यांच्या गोष्टी सांगताना आणि देवपूजा करताना. अप्पाची देवपूजा म्हणजे एक गाण्याची वैठकच होती. तीन तीन तास चाले. अगदी



भल्या पहाटे उठणे, जमिनीवर पाय घासत घासत, सोपा पडवी अंगण करत शौचमुखमार्जन करणे. त्यानंतर तबकात फुले गोळा करणे. पारिजात, मोगरा, तगरी, गुलबक्षी सगळी फुले तबकात विशिष्ट क्रमाने खुडून विशिष्ट ठिकाणी ठेवणे. फुले खुडल्याचा क्रम सुद्धा बदललेला अप्पास मुळीच खपत नसे. एकदा आप्पानं मथूला फुलं गोळा करायला सांगितलं होतं. अप्पा सांभाऱ्यांकडला गाण्या-वजावण्याचा फड ऐकून नुकताच आला होता. मथूला म्हणाला "मी स्वर गोळा करतो तू फुलं गोळा कर." मथूच्या डोळ्यावर झोप होती. तिला काहीच समजल नाही. तिनं तोंडावरून हात फिरवला. केस सारखे केले. तबक आणलं. अंगणभर पारि-जाताचा सडा पडला होता. पाय ठेवायला जागा नव्हती. म्हणून तिनं पहिल्यानं पारिजाताची फुलं गोळा करायला सुरवात केली. परसातली डोण पाण्यानं भरत असलेल्या अप्पानं ते पाहताच सांगितलं होतं, "मथे पारिजात फार नाजुक असतो. सकाळसकाळचा जमिनीचा गारवा जास्तीत जास्त मिळू द्यावा त्याला." अप्पाचा स्वर इतका खालचा कसा याचं मथूला आश्चर्य वाटलं होतं. एक दिवस पायावरचं पांघरूण सारखं करण्यासाठी मथू अंथरुणातच उठून बसली आणि तिनं समोर पाहिलं तर खाली पडवीत कंदील बारीक करून अप्पा अंगणात टक लावून पहात उभा. मथीला राहवेना. ती अप्पाच्या जवळ जाऊन उभी राहिली. अप्पानं तोंडावर बोट ठेवून पारिजाताकडं वोट केलं. मंद वारा वाहात होता. पारि-जाताची फुलं टप् टप् खाली पडत होती. आणि एक मोठा साप त्या फुलांतून हळू हळू पुढं सरकत होता. तो अंगणाच्या भिंती-



अनुक्रमणिका

वरून दिसेनासा होईपर्यंत दोघेही उभे होते. स्तब्ध. अप्पा म्हणाला "पाहिलंस ना हा साप सुगंधानं जड झाला होता तो... म्हणूनच नाही मारलं त्याला. ज्याला पळता येत नाही त्याला काय मारायचं." एकंदर काय. पारिजाताबद्दल अप्पाला खास काहीतरी वाटे.

मग फुलं गोळा करून झाली की अप्पाची आंघोळ चाले. गार पाण्यानं आंघोळ. उच्चस्वरात स्तोत्रं वगैरे म्हटली जात. मथी, यमी जे कोणी दिसेल त्याला फर्मान सुटे पाठीवर पाणी घाल. हंडाभर तरी पाणी लागत असेल. खरखरीत दगडानं अंग घासून काढी. साबण इत्यादींना चोजले म्हणे. हातातही घेत नसे. अप्पाचं गोरं अंग मग लालसर दिसू लागे. उन्हात दिवसभर वाळून कडकडीत झालेल्या पंचानं अंग पुसे. आणि मग लख्ख घासून ठेवलेल्या लोटीतून पाणी घेऊन अप्पा ओलेत्याने पूजेला बसे. देवघरात देव खूप होते. शाळिग्राम, बाळकृष्ण, निरनिराळी यंत्र. १००–१२५ वर्षांची ती गुरुचरित्राची पोथी, आजोबांचा टाक, पणजोबांचा बाण. कितीतरी देव. अप्पा गंधही छान उगाळी. दाटसर मऊ गंध. देवांना आंघोळ, मग अंग पुसणे, मग गंधफूल, शेवटी स्तोत्र, आरत्या, अशी अप्पाची पूजा रंगत जाई. इतर लोकांची जेवण-खाणी, येणी-जाणी चालूच रहात. मथीसुद्धा जेवण आटपून भोग्याची वाट पहात असे. साधारणतः त्याच सुमारास अप्पा नैवेद्याची वाटी मथीला देई. साखर, दूध जे काही असेल ते. गंधपुष्पांचा ओलसर वास येणारा नैवेद्य मटकावयाला मथीला फार आवडे. नैवेद्य खाऊन झाला की "अप्पा जाते" म्हणून धूम ठोकायची ती एकदम शाळेत.

अप्पाचं जेवण झाकून ठेवलेलं असायचं. पाय पोटाशी घेऊन अप्पा भरभर जेवायचा. लोटाभर पाणी प्यायचा आणि फेटा बांधून, पुणेरी जोडे घालून सराफ कट्ट्यावर जायचा. अप्पा जवाहिरी करी थोडीशी. त्याच्या खोलीत मोठा लाकडी हडपा होता. त्यात पुरचुंड्या करून खडे बांधून ठेवलेले असत. खोलीत कधी चिमणीपेक्षा मोठा दिवा लागला नाही. आणि खोली तर इतकी अंधेरी की दिवसासुद्धा दबकत पाय टाकावा. अप्पाला मात्र अंधाराचा काहीच अडसर भासत नसे. कोणत्या कोपऱ्यात सुतळीचा तोडा असेल हेही त्याच्या हातांना विनचूक माहीत असे. सराफकट्ट्यावरून जाऊन आला की अप्पा विश्रांति घेई. चारच्या सुमारास चहासाठी स्टो फुरफुरू लागला की उठे. चहा पितळीतून फुरफुरून पिई आणि झाडांना पाणी घाली. तोपर्यंत दादा-अप्पाचे काका कचेरीतून आलेले असत. त्यांच्याशी चार गप्पा मारी. आणि मग बागेतल्या गणपतीला चालायला लागे. दादांशी संध्याकाळी होणाऱ्या गप्पा हाच घरच्या माणसांशी अप्पाचा संबंध. रात्री अप्पा जेवीत नसे. दूध पीत असे. तुपाचा थेंब घातलेलं. ते सुद्धा रात्री गाणबजावणं ऐकून झाल्यावर.

तीस वर्षांच्या अप्पाच्या आयुष्याचं असं चक्र संथ चाललं. अप्पा विधुर होता. मथी ही त्याची एकुलती एक मुलगी. दादा एवढे सरकारी कारभारी. गावात त्यांच्या सल्ल्याशिवाय पान हलत नसे.

**आप्पा एक विधुर. एरवी हिऱ्यांची पारख तो मोठ्या कौशल्यानं करी. संगीतातला पण तो मोठा दर्दी नि जाणकार पण बैठकीत गायिलेल्या यल्लीच्या आवाजाची पारख त्याला करता आली का?**

पण अप्पाला पुन्हा लग्न कर असं सांगायचा धीर त्यांनाही झाला नव्हता. बायको गेल्यापासून रात्रीचं जेवण आणि खोलीतला दिवा या दोन गोष्टी अप्पानं बंद केल्या होत्या. गाण्याचा छंद चालूच होता.

पण त्याही बाबतीत थोडा बदल झाला होता. अप्पा साम्भाऱ्यांच्या कडे भजनाना पूर्वीपासून जाई. पण गात नसे. ज्या दिवशी बायको गेली त्या रात्री भजनाला अप्पा नेहमीसारखा आलेला पाहूनच आधी मंडळी चिडीचिप झाली होती. त्यात आणि कल्पना नसता अप्पानं 'सुंदर ते ध्यान' हा चरण उचलून वरचा स्वर अगदी खडा लावल्यावर तर काय बघायलाच नको. अप्पानं त्या दिवशी अगदी कमालच केली होती. सांभाऱ्यांच्या सोप्यावरच्या बैठकीत ऐकलेले सारे राग जणू त्या दिवशी त्याच्यासमोर हात जोडून उभे राहिले होते. यमन, भूप, विहाग, बागेश्री एकातून दुसऱ्यात सहजासहजी जात-येत होता. तळ्यात मळ्यात खेळताना मुलं आत बाहेर करतात तसं रागातून फिरत होता. आणि वरचा स्वर तर अप्पा लावत होता की एकतारी हातात घेतलेल्या बंडाबुवाच्या हाताला झिणझिण्या येत होत्या. भजन संपल्यावर अप्पा काही न बोलता घरी आला होता. तो जाईपर्यन्त मंडळी श्वास रोखून बसली होती.

आदल्याच दिवशी सांभाऱ्यांच्या गणपतीपुढं हजेरी लावण्यासाठी यल्ली आली होती. माडीवर उतरली होती. आणि हा तडफदार आवाजवाला कोण अशी तिनं सांभाऱ्यांजवळ चौकशी केली होती.

याही वर्षी यल्ली नेहमीसारखी आली आणि सरकारांपुढं आपली वर्दी लावण्याची इच्छा आहे असं कारभाऱ्यांना कळविण्यासाठी दादांना भेटायला आली. सांभाऱ्यांच्या कडे येणारे गायक-वादक निदान यासाठी तर दादांकडे येतच. दादा त्यांचे चांगले आगत-स्वागत करीत. उत्सव झाला की कोणी कोणी एखादा दिवस दादांकडे मेजवानीसही राही.

यल्ली होती गोरी-गोमटी आणि ठेंगणी ठुसकी. ओठावर उजव्या हाताला चामखीळ होती. गच्च खोपा बांधी. हातात एक हिऱ्याची अंगठी आणि नाकात चमकी. हाताची बोटे काही लांबसडक वगैरे नव्हती पण मऊ आणि सुडौल होती. तंबोरा वाजवताना खर्जाची तार वाजवून झाली की करंगळी थोडीशी वर उचलायची सवय होती तिला. आणि त्यावेळेला सारा पंजाच पंख फुटल्यासारखा वाटे. यल्लीचा आवाज किनराच. पण किरटा नव्हता. आणि सुरेलपणा तर अंगचाच वाटे. गंधार पंचम-षड्जाच्या बाबतीत अगदी हुकमी काम. थंडीच्या दिवसांत अलगद दुलईत शिरावे तसं या स्वरात ती शिरे. असं वाटे पहिल्यापासून तिथेच होती. दत्ता-








सारखे अनेक गुरु केले असं सांगे आणि तिच्या गाण्यातही याची साक्ष पटे. ध्रुपदापासून भजनापर्यंत आणि ठुमरीपासून लावणीपर्यंत सगळं गाई.

दादांकडे आली तेव्हा दादा वर माडीवर होते. त्यांना बोलवायला मथी वर धावली आणि यल्ली सोप्यावर बसली. तिच्याबरोबरची कुणबीण पडवीत बसली.

दादांना यायला वेळ लागला तेव्हा यल्लीनं आपली कलाबूतीची चंची उघडली. आधीच करून टेवलेलं पान काढून तोंडात घातलं. आणि आपली स्वस्थ मांडी घालून बसली. सोप्यावरच्या तसबिरी पहात. पहाता पहाता तिच्या लक्षात आलं की आपल्याकडं कोणीतरी पहातंय्. मागे वळून पहाते तो मथी. वेणी तोंडात घालून एवढे एवढे डोळे करून. केसातल्या सोन्याच्या फुलाकडं पाहतेय्.

"हंवय् तुला?" यल्लीनं विचारलं.

मथीनं एकदा मान हलवली.

"तुझी वेणी कुणी घातली?" मथीनं एकदम विचारलं ?

यल्लीला हसू आलं. तिनं पडवीत बसलेल्या कुणबीणीकडे बोट दाखवलं.

"माझी वेणी अप्पा घालतात."

"अप्पा कोण ?"

"माझे वडील."

"आत्ता ग बाई" पडवीवरून कुणबीण म्हणाली. यल्लीनं तिला दाबलं. अप्पा स्नान करून ओलेत्यानं देवघरात जात होता. स्तोत्र म्हणत. यल्लीकडं पाहिल्यासारखं केलन् त्यानं. यल्लीनं डोक्यावरचा पदर सारखा केला. अप्पा आत गेल्यावर मथी यल्लीसमोरच्या दोन खांबा भोवती आळीपाळीने फिरू लागली. फिरता फिरता म्हणाली,

"आमच्या अप्पाकडे सुद्धा खडे आहेत. तुझ्या अंगठीतल्यापेक्षा मोठे..." एवढ्यात आवाज आला "मथे, काय चाललय्?" आणि दादा फेटा बांधीत आत आले. यल्ली उठून उभी राहिली.

"बसा बाई बसा, कचेरीला जायच्या तयारीतच आहे. बोला काय काम आहे?" दादा आणि यल्ली बोलत बसले होते. मथी आपली अधून मधून डोकावत राहिली. कधी कुणबिणीकडं बघे तर कधी यल्लीकडं.



"हा माझा पुतण्या... हिऱ्याची फार चांगली पारख आहे याला." मध्ये अप्पा निर्माल्य टाकायला आला असता दादा म्हणाले "शिवाय आवाजही छान आहे आणि गाण्याचीही चांगली आवड आहे."

अप्पाने एकवार यल्लीकडे पाहून हात जोडल्यासारखे केले. आणि तो निर्माल्य टाकण्यासाठी निघून गेला.

"मग ते आज रात्री गाणं ऐकायला येतीलच की नाही... आम्ही त्यांचं भजन ऐकलय्. छान गातात." यल्ली नम्रतेने म्हणाली.

"हां, वाड्यातलं गाणं... म्हणजे सरकारांचं काम तेव्हा आम्हा सगळ्यांना यायला लागतंच." दादा म्हणाले आणि उठले. "जणू काय माझ्या गाण्यासाठी आलेच नसते" यल्ली मनात पुटपुटली.

रात्री गाण्याच्या वेळेला सरकारस्वारी यायला वेळ होता आणि वाद्यं तर जुळवून झाली होती. यल्लीनं समोरच्या चंचीतून चांदीची डबी काढली. त्यातून आल्याचे तुकडे खाता खाता तिनं पाहिलं अप्पा कुठं दिसतो का... समोर सरकारस्वारीची जागा रिकामी होती... त्याच्या आसपास दरबारी मंडळी व त्याही मागे इतर आमंत्रित अशी व्यवस्था होती... अप्पा काही अजून आलेला दिसत नव्हता.

येवढ्यात सरकारस्वारी आली. मुजरे झाले आणि गाण्याला सुरवात झाली. अप्पा केव्हा आला आणि सरकारांच्या मागे उजव्या बाजूस खांबाला टेकून बसला ते कळलंही नाही. गाता गाता अप्पाकडं पाहिलं तर "किती ताठ बसतो हा माणूस" असं पहिल्यांदा मनात येई... आणि डोळे सदा मिटलेले... "जणू काही ध्यानाला बसलाय् बामण" यल्ली मनात म्हणाली. फक्त त्याच्या पापण्या अधून मधून थरथरत... सुटण्यासाठी पाखरानं धडपड करावी तशा.

यल्ली गात राहिली... अप्पा गाणं ऐकत राहिला. त्याला सर्व अंग गरम झालय् असं वाटू लागलं... रक्त डोक्याकडं उसळी घेऊ लागलं... अंगातून एक वीज सळसळत जावी तसं वरचे स्वर कानात शिरले की होऊ लागतं.. आतल्या आत सर्वांगभर कोणी तरी खिदळत फिरतय् जणू.

अप्पाच्या भोवती खूप वर्तुळं हात धरून फिरू लागली... गरगरत... भरारत... दुपारच्या वेळी माळावर घोंघावणाऱ्या वाऱ्यासारखी ओढून घेणारी... वर खेचून नेणारी... वर्तुळं फिरणाऱ्या जमिनीला हसू लागली....

जीभ कोरडी पडतेय् माझी... ओठ शुष्क ... डोळे आत ओढताहेत. पोटापासून काहीतरी घुसळत घुसळत वर येतय्.. थैमान घालत ... मी फुटणार आता... शिवे हे स्वर अंगावर किती जड झालेत... छपराच्या वरपर्यंत एक एक स्वर उंच.. चिरडणार मी आता या खाली... गलबलतय मनात. रडू का जोरानं.. डोळ्यात पाणी खळाळलं की बरं वाटेल. किती दिवसात रडलोच नाही... भूमि तापतेय् नुसती... बसता येत नाही.... उठता तरी









कुठं येतय् आणि इथं उठायचय् तरी कोणाला. . . खुळ्यासारखंच होतय् गडबडा लोळावसं वाटतय. . . हसावसं पण. . .आठवत नाही आता. . .

टाळ्यांचा कडकडाट झाला आणि यल्लीनं तंबोरा खाली ठेवला. सरकारांना झुकून नमस्कार केला. . . . अप्पानं पागोटं काढून हातात घेतलं. अंगभर घाम फुटला होता. एखाद्या जखमी हरणाच्या डोळ्या-प्रमाणं डोळे आपोआप उघडले. यल्लीकडं डोळे टक लावून पहात राहिले. अप्पा कुठं होता कुणास ठाउक.

दुसऱ्या दिवशी अप्पा जरा जास्तच लवकर उठला. सगळे कार्यक्रम भराभरा उरकून पूजेला बसणार येवढ्यात सरकारांकडून सांगावा आला "जसे असाल तसे या.". . .जायलाच लागलं अप्पाला.

वाड्यात पोचला तेव्हा सरकार वाटच पहात होते.

"आम्हाला माहीत आहे तुमच्या पूजेत आम्ही व्यत्यय आणला असेल. पण आज दोन प्रहरी पुण्याला जायचय्. कालच्या गाण्याची बिदागी अजून आम्हाला द्यायची आहे. ती हिऱ्याच्या दागिन्याच्या स्वरूपात द्यावी अशी आमची इच्छा आहे. तेव्हा तुमच्याकडून पारख झालेली बरी. . . आता आम्ही यल्लीलाही बोलावणं पाठविलं आहे."

"जशी आज्ञा" येवढंच बोलून अप्पा स्वस्थ बसून राहिला.

"तुम्हाला कशी काय वाटली बाईंची तयारी ?" सरकारांनी क्षणभर थांबून विचारलं.

अप्पानं तोंडावरून हात फिरवला . . .

"आम्हाला काय समजतय् सरकार . . ."

"असं कसं आप्पा... तुम्ही तर त्यातले दर्दी. . . राजवैद्यांच्या बैठकीत सदा असणारे. . आणि शिवाय बाई म्हणत होत्या की गाताही फार छान म्हणून."

"गातो कसलं . . . भजन करतो सरकार."

"आमचा मुक्काम पुण्यातच फार. त्यामुळं तुमचं भजन ऐकण्याचा योग आला नाही. . . . एकदा वाड्यातच या तुम्ही". अप्पा काही बोलणार येवढ्यात पुन्हा सरकार म्हणाले.

"मग बाईंच गाणं कसं झालं ते नाही सांगितलत् ?"

सरकार उत्तरासाठी थांबलेत असं पाहून अप्पाचा नाईलाज झाला.

"सरकार, बाई अजून दुसऱ्यासाठी गातात. . चांगल्या गातात पण दुसऱ्यासाठी. . .स्वतःसाठी गायला लागल्या ना की खऱ्या गातील. . . आता फक्त चांगल्या गातात."

सरकारांचा चेहरा गोंधळलेला पाहून अप्पाही थोडासा बावरला.

"ते सांगणं अवघड आहे सरकार.. पण. . येवढ्यात दुसऱ्यानं यल्ली आल्याची वर्दी दिली आणि अप्पानं सुटकेचा निःश्वास टाकला.

यल्लीनं साधंच पण चमकदार पांढऱ्या रंगाचं पातळ नेसलं होतं. तिच्या गौर वर्णाला ते चांगलं खुलून दिसत होतं. ओठावर पानानं रंगलेल्याची किंचित झाक होती. आणि डोळ्यात आदल्या रात्रीचं गाणं जिंकल्याची धुंदी.

सरकारानी लागलीच हिरे आणविले. अप्पानं आपल्या कसबी नजरेनं पाहिजे त्या आकाराचे व पाण्याचे हिरे मोजून बाजूला



## स्वरमंडळ :२

**'दादऱ्यांत मस्ती हवी'**
**इति खांसाहेब.**
**'मागणाऱ्यानं वेळ पहावी**
**मागतो त्याची जात जाणावी'**
**इति फुटलेल्या पानासह रोशनबी.**
**बिस्किटाच्या डब्यांत चहा बुडवून बोटे तट्ट फुगली**
**म्हणजे वाजणारा दादरा फक्त जस्ती असतो.**
**दादऱ्याची कश्ती डगमगायला लागली**
**कीं चुनाळ थकल्या बोटांनी रक्तांजिर लावावा.**
**दादऱ्याचे सौभाग्य राखावे. —अशोक रानडे**

काढायला सुरवात केली. यल्लीकडे त्यानं जराशीही नजर दिली नाही. यल्ली जराशी रागावलीच. . मग जरा हंसून म्हणाली "सरकारांच्या जवाहिऱ्याना गाण्याची पण फारच पारख आहे असं ऐकलय्." तरीही अप्पा स्तब्धच. . . फक्त हिऱ्यांना जोखणारा हात एकदा थरथरला आणि बोटं हातातल्या हिऱ्यावर किंचित् अधिक स्थिरावली.

"अप्पा म्हणतात की तुम्ही अजून स्वतःसाठी गात नाही... दुसऱ्यासाठी गाता." सरकार एकदम उद्गारले.

अप्पा क्षणभर चकित होऊन त्यांच्याकडं स्तिमित होऊन बघत राहिला.

"म्हणजे काय ते समजून तरी सांगावं आम्हाला" यल्ली ठसक्यात म्हणाली, "मी एकवीस गुरु केलेत.. त्यात आणि एकाची भर घालून जर विद्येत भर होणार असेल तर..." वाक्य अर्धवट सोडून यल्ली पदरानं वारं घेऊ लागली. सरकारही जरासं हंसून अपेक्षेनं अप्पाकडं पाहू लागले.

अप्पानं आवंढा गिळून एक सुस्कारा सोडला "ठीक आहे... इतका आग्रहच असेल सरकारांचा तर सांगतो... बाई धंदेवाईक आहेत आणि मग गायिका आहेत. . तेव्हा त्यांच्या मनात पहिलं स्थान असतं ते लोकांना आवडेल, चांगलं वाटेल, ते गाण्यावर. मनात जे गाणं खरं वाटतं ते गाण्यावर नाही. स्वरांचा परिणाम झाला का, होतोय् का हे बाई बघतात आणि मग त्यांना स्वर दिसतच नाही.. यापेक्षा आणि नाही सांगता यायच सरकार" येवढं बोलून निवडून बाजूला काढलेले हिरे अप्पानं सरकारांच्या पुढे ठेवले आणि सरकारना नमस्कार करून तो बाहेर पडला. . . सरकारांचा हुजऱ्या पाठीमागून आला होता त्यालाही परत पाठवून. थेट घराकडंच आला.

यल्लीची अक्षरशः तगमग झाली. सरकारांपुढं तिनं सगळं हसण्यावारी नेलं पण ती अस्वस्थ झाली होती. एका भजन्यानं





अनुक्रमणिका

टीका केली तर अस्वस्थ होण्याचं काय कारण असं मनाला कितीही समजावलं तरी ती धुसफुसत राहिली. रुखरुख लावणारं, पाठी-वरच्या न दिसणाऱ्या दुसऱ्या भागावर प्रहार व्हावा तसं काहीतरी वाटत होतं.

यल्ली घरी आली. आणि दिवसभर घरातून बाहेरच पडली नाही. आज होता गुरुवार. भजनाचा वार. खाली भजनी मंडळी जमू लागली आणि वर यल्लीनं गायला सुरवात केली. दारं-खिडक्या बंद करून यमन घुमू लागला. आज जरा चढ्या पट्टीतच गात होती. तीव्र मध्यम आणि निषाद अगदी टोकदार झाले होते. त्यात आणि झणकारणारा तार षड्ज. .

भजन उभंच राहिना. गालिचावर जोडे घालून जायला घाबरावं तसं भजनी लोक यल्लीनं पसरलेल्या सुरेल बिछायतीवर आपले रांगडे सूर घेऊन जायला दवकू लागले. मृदंगाला घुमाळीची धूम उठवेना. सगळ्यांचे कान जीव ओतून गाणं ऐकताहेत व गळे वा हात यंत्राप्रमाणं चालले आहेत असा प्रकार झाला. वैद्यराज हाडाचे रसिक. त्यांनी हंसून भजन थांबविलं. म्हणाले "स्वरांची महापूजा उभी राहतेय्. . . कान भरून घ्या." सगळे स्तब्ध झाले.

यल्लीच्या आवर्तनी ताना सुरू झाल्या. तिन्ही सप्तकात फिर-णाऱ्या आपल्या गुंतागुंतीनं नजर फिरवणाऱ्या. भोवऱ्यात सापडल्या सारखं डोकं गरगरू लागलं. त्यात आणि यल्लीनं दमसासीचा चमत्कार दाखवायला सुरवात केली. एका दमात ती अशी प्रदीर्घ आणि मुष्किल फिरू लागली की ऐकणाऱ्याचा जीव कोंडू लागला. आवाज असा लावला होता की कणाकणाचा पीळ पाहून घ्यावा आणि हरवून जावं. आवाज नव्हता तो. विजेचा लोळच. एकाएकी यल्ली थांबली. नुसताच तंबोरा झणकारत राहिला. . . आणि मग एकदम भैरवीतली ठुमरी सुरू केली तिनं "बाबुल मोरा नेहर छुटो जाय."

जीवाला गलबलून टाकणारी भैरवी . . . केव्हा येणार पलीकडची डोली ?... जगाशी नातं संपविणारा प्रश्न आर्तपणे सर्वांच्या भोवती फिरू लागला आणि साऱ्यांचे डोळे ओले झाले. . . गाणं बंद केव्हा झालं ते समजलं नाही. .... हळू हळू वर खिडकी उघडली आणि यल्ली तिथे उभी राहिली. तिनं पुढं झुकून विचा-रले, "काय मंडळी भजन थांबविलतसं ?"

वैद्यराज प्रथम उभे राहिले आणि म्हणाले, "बाई आपण आधी खाली या. . म्हाळसेला दृष्ट काढायला सांगतो तुमची. . . काय गायलात आज. . . वा. . वा!" यल्ली किंचित्‌शी हसली आणि अप्पाकडं एकदा पाहून खाली यायला निघाली. अप्पा उभाच होता... तसाच बाहेर पडला.

बाहेर पडला तो तपोवनात जाऊन बसला. स्वयंभू मारुतीच्या ओट्यावर. त्याचं डोकं जड झालं होतं. थोड्या वेळानं उठून परत येऊ लागला. संवयीप्रमाणं त्याचे पाय देवळाकडं वळले. उजव्या हातानं घंटा वाजवून मग हात जोडून तो उभा राहिला. घंटेचा आवाज रात्रीच्या शांत वेळी बराच घुमत राहिला.... डोळे तारवटून अप्पा मारुतीकडे बघत राहिला. एरवी बलदंडतीच्या मारु डोळ्यात बघत अप्पा "हनुमन्त काय सागतो रे ! बलवन्त व्हा रे" इ. लहानपणी हा व्यायामशाळेत वाचलेल्या पद्यांची आठवण करीत बसायचा. आज मूर्तीच्या डोळ्यात पहाण्याची त्याला हिंमत होईना. थोडासा जास्तच शेंदूर खरवडून तो भारल्यासारखा देवळातून बाहेर पडला.

यल्लीच्या पायरीवर बसून अप्पाने सांभाऱ्याच्या सोप्यावरील पानदानातून पान घेऊन एक विडा बनविला. भरपूर शेंदूर घालून. तो यल्लीच्या दारावर पोचला. त्याची छाती धडधडत होती. दारावर ठोठावल्यावर यल्लीनंच दार उघडलं. अप्पाला बघून ती क्षणभर चमकली. मग स्वत:ला सावरून दारातून बाजूला झाली. तिनं अप्पाला आत येण्याची खूण केली. अप्पा चाचपडत आत आला. तक्क्याजवळ बसला. यल्ली समोर बसली. . . . किंचित् हंसून म्हणाली "गाइले ना स्वत:साठी?"

"नाही यल्ले. . .फार चांगली गायलीस पण. . ." अप्पा शब्द शोधू लागला. यल्ली व्यग्र मनाने गालीचातल्या फुलाची आकृति बोटाने रेखीत बसली.

"गायलीस अशी की लोक स्वत:ला हरवून गेले... पण तू स्वत: भान नाही विसरलीस... नाही तर नंतर खिडकीतून वेड्यासारखा प्रश्न विचारला नसतास यल्ले. . . " कोपऱ्यातला कंदील वाऱ्यानं भगभगू लागला. . . वाऱ्याची एक झुळुक आली.. हलत्या प्रकाशात यल्लीच्या कपाळावरचे घर्मबिंदु चमकत होते. आणि नाकातली चमकी पण. . .

"भजनाच्याच वेळेस का गायलीस यल्ले.. इतक्या सगळ्यांवर मी मात करते असं दाखवायला . . की हरिनामापेक्षा माझ्या आवाजात धुंदी जास्त आहे असा दिमाख दाखवायला. . इतका अभिमान बरा नाही यल्ले. . . त्यानं देणगी दिली त्याला तोरा दाखवणं बरं नाही यल्ले. . . " अप्पा बोलून धाप लागल्यासारखा थांबला.

"हा बघ मी तुझ्यासाठी विडा आणलाय्. . शेंदूर घातलेला."

"अप्पा. . .?"

". . जरा देवानं कमी आवाज दिला असता तर अशी मत्त झाली नसतीस यल्ले... खा हा. . तुझा आवाज चिप्प बसेल.. मग वैद्यराज औषध देतील. तुझा आवाज सुधारेल पण त्यातलं तेज नाहींसं झालेलं असेल. . . मग स्वराला आळवशील यल्ले.. त्यांची करुणा भाकशील. . त्याच्यावर स्वार होणार नाहीस... आत बघून गायला लागशील. . . स्वत:साठी गाण्याखेरीज मार्गच राहणार नाही."

यल्ली ओक्साबोक्शी रडू लागली. अप्पा निमूटपणे बाहेर पडला.

"अप्पा. . . अप्पा. . . अरे वेड्या तुला काहीच समजलं नाही रे. . . अरे मी तुझ्यासाठी गात होते. . तुझ्यासाठी गात होते. . ."

● ● ●







अनुक्रमणिका

तू गात रहा गे अशीच राही गात
तू वर्षा होऊन हर्षा ये उधळीत
असं लताबाईंच्या बद्दल
कौतुकानं म्हटलं जातं.
त्यांच्याच गाण्याची
तरफदारी करणारा
हा ललित लेख



# ल ते चे गा णे

**सिनेमा** पाहणं ही एक संस्कृती आहे असं मानलं तर दहा वर्षांपासून या संस्कृतीशी माझा जवळचा संबंध राहिलेला नाही. मित्रांच्या आग्रहास्तव एखादा चित्र-पट पहायला जातो. पण ते काही खरं नसतं. मुख्य म्हणजे मित्रांचे पैसे पाण्यात जाऊ नये म्हणून मी भुतासारखा बसून राहतो. माझ्या मनाचा पडदा रिकामा रहात असला तरी समोरच्या पडद्यावरील हालचाली मी काही थांबवू शकत नाही. लताचं गाणं हा अशावेळी एकमेव आधार. पण नुसती लताच गात आहे असा सिनेमा अजून निघाला नाही हेही खरं.

समोर दिसणाऱ्या पडद्याआड लता नावाचं एक असं आकाश असतं की तुम्ही जिथं जाल तिथं ते आपलं हजर असतंच. तुमच्या गावी वांगी होतात किंवा नाही हा प्रश्न ठीकच असतो. पण तुमच्याही गावी आकाश आहे का हो असा प्रश्न कुणीच कुणाला विचारीत नाही. ताज-महाल किंवा इराण्याच्या हॉटेलाची गोष्टच सोडा, एखादं मोडकं टेबल जेमतेम ठेवलं आहे अशा एखाद्या जंगलकाठच्या बस-स्टॅंडवरील हॉटेलात कालप्रवाहात अजून दहा वर्षे मागं राहिलेला पोरगा गुणगुणत असतो,

'हवामें उडता जाये. मेरा लाल दुपट्टा......"

जे इतकं सर्वत्र असेल त्याला लगेच गुळगुळीत होण्याचा शाप असतो. अनन्य-साधारणाची आणि त्याची चुकामूक ही तर आधीच ठरविलेल्या भेटीपेक्षाही अधिक अटळ असते. पण लता हा एक असा कुंज आहे जिथं ही कबुतरं आणि ससाणे आज पंचवीस वर्षे एकत्र क्रीडत आहेत.

आपल्या महाराष्ट्रात नाट्यसंगीत नावाचा एक गायन प्रकार आहे. (वस्तुतः तो मुळात नाट्यप्रकार असावा.) नाटक सुरू असताना तो मला एकदम नापसंत आहे. बैठकीत मात्र तो चांगला वाटतो. सुंदरी कृतकको‌पानं रुसली आहे. रुसवा जाण्यासाठी तिला प्रियकराच्या हातून गालावरील टिचकीची वा अन्य अनु-नयाची अपेक्षा आहे. पण हा भोळासांब मात्र गमका आणि फिरकीच्या घमासान जंगलात शिरला आहे. वेळात वेळ काढून मग तो पुन्हा स्थायीला येतो. 'नको सुंदरी करू कोपा.......'

मेक बिलव्हला अगदी शेक्सपिअरच्या कृत्रिम चंद्रापर्यंत ताणलं तरी हा प्रकार 'बिलिव्हेबल' नाही हेच खरं. सिनेमा हेही एक नाटकच. त्यातील पात्रानं तरी उठल्या बसल्या गाणं बरं आहे का? हाच प्रश्न अनेकदा स्वतः लतेलाही पडला असावा.

**वामन इंगळे**

तिच्या गाण्यात नैसर्गिकपणे स्वतःशीच गुणगुणण्याचा जो अति सुंदर भाग आहे तो या प्रश्नाचं एक चांगलं उत्तर आहे. म्हणजे नाटक सिनेमातील सर्व गाणं जरी पुढेमागं कटाप झालं तरी त्यावेळी गुण-गुणण्याची राणी हे नाव मिळवील एकटी लताच. नाट्यसंगीताचं इतकं चांगलं बेअरिंग सांभाळणारा कलावंत गेल्या शतकात हिंदुस्थानात कुणी झाला असेल असं वाटत नाही. झाला असेल तर मी ऐकला नाही. एवढंच. असं म्हणताना सैगल, खुर्शिद, कानन, अमीरबाई आदि सिने-कलावंतांचा (आणि नाट्यकलावंतांचाही) अवमान व्हावा हा हेतु नाही. विशेषतः कुंदनलाल सेहगल सारख्या गुणी गाय-काचा तर नाहीच नाही. पण व्हायचं काय को देवदास असो वा शहाजहान-मधाल कवि असो; स्वर वैशिष्ठ्याच्या दृष्टीनं त्यात कुंदनलालांचाही एक सरळ-सोठ एकमार्गीपणाच असायचा. गाजलेल्या एका श्रेष्ठाची ही कथा. तेव्हां गर्ती नायिका देखील गात त्या एका गेंगाण्या मादक सुरात. (कोठीवरचं गाणं चक्क देवघरात सुरू आहे असा भास व्हायचा.) लतेचं अगदी अलिकडचं 'मावळत्या दिनकरा' आणि तिचंच 'आगे तेरी मरजी' या दोन








गाण्यातील फरक अशा अनेक फरकांचे सुतोवाच करणारा आहे. या दृष्टीनं लता ही या देशाची एकमेव नाटचगीत गायिका आहे.

लतेच्या गानसंभारातून बेस्ट ऑफ लता असं एखादं गाणं निवडणं नुसतंच अवघडच नाही, ते आवश्यकही नाही. विसंगत, बेसूर कणखर कर्कश हे तर फारच झालं. पण लतेचं फसलेलं गाणं हेही दाखविणं मुष्किलच आहे. पण तरी मला लतेची अगदी अलिकडची गाणी पाडावा तेवढा मोह पाडत नाहीत. पाच दहा वर्षांपूर्वीची गाणी मात्र बेहद्द आवडतात. माझ्या न आवडण्याचा दोष शंभर टक्के संगीतकारांचा आहे. एखाद्या गाण्याची चमकदार स्थायी तर मचूळ अंतरा. अंतऱ्यात एखादी जीव हरऊन टाकणारी हरकत तर त्यामागचा सगळा बदसूर बेंडबाजा. हे असं नेहमीच होतं. उदाहरणादाखल आशाचं 'छोटासा बालमा...' हे गाणं आठवतं आहे. स्थायीत संगीत दिग्दर्शक आकाशातील तारे तोडून आणण्यासाठी निघाला आहे. पण भुईसपाट अंतऱ्यानं एका चांगल्या गाण्याच्या गळयाला नख लावलं आहे.

लता आज पंचवीस वर्षे ज्यांच्यात राहते त्यांना तिचा अजूनही चांगला उपयोग करून घेता आला नाही असं केवळ गाणं ऐकणाऱ्यानं म्हणावं हा कदाचित धाडसाचा प्रकार असेल. असेलही. पण मला वाटतं ऐकणाऱ्याला असं धाडस करण्याचा पूर्ण अधिकार असावा. लताच्या तय्यार आवालावर एखाद्या धुनउगम रागाचं वा भयवाचं कलम करण्यात आलं तर कुमारांनी जे आशययुक्त गाणं जन्मास घातलं त्याला चपखल माध्यम सांपडण्याची एक आशा मला स्वतःला आहे.

आहे त्या स्थीतीतही अनिल बिश्वास, बर्मन, स्व. खेमचंदनी, नौशाद आणि हृदयनाथांनी लतेच्या आवाजाचा काही ठिकाणी प्रयोक उपयोग केला आहे. आता मी ज्या एकदोन जागा दाखवून देत आहे त्या जर माझ्या अज्ञानामुळे इतर कुण्या गायिकेच्या गाण्यातील असतील तर माझे त्या (मला) अज्ञात असलेल्या सुरांनाही वंदन आहे.

'तोड दिया दिल मेरा...' आणि 'उठाये जा उनके सितम....'

आज ही दोन गीतं फारशी कानावर येत नाहीत. पण जेव्हा ती येतात तेव्हा इराणी संगीतातील काही रेखीव प्रतिमा मनात उभ्या करतात. तू वे अरे बेवफाच्या मध्ये फक्त नूरजहानच गळयातून काढू शकेल असे स्वरांचे थेंब आहेत. चांगला सितार सरोदिया मिंडीतून अशा टपटपणाऱ्या थेंबांचा आभास निर्माण करू शकतो. पण एक फरक आहे. लतेचा हा स्वर थेंब पाण्याचा नाही. घनदाट जंगलात एखाद्या महावृक्षावर मोहोळ जमलं असावं. रस पूर्ण भरल्यावर एखाद्या पाखरानं आपली चोंच खुपसावी. रक्तबंबाळ झालेल्या मोहोळातील मध झाडाच्या खोडावर पसरावा. मधाचा एखादा थेंब खाली पडण्याच्या बेतास यावा. खाली पडल्याशिवाय तर गत्यंतर नाही. पण आहे तिथून लवकर सुटकाही नाही. एकच एक स्वर थेंब. पण केंद्रापासून बाहेर धावणाऱ्या अमूर्तामूर्त संवेदन लहरी मात्र जिवास होरपळविणाऱ्या.

'झनझनझनझन पायल बाजे'च्या अंतऱ्यात अशीच एक गंमत आहे. इत बरसे....नंतर एक अर्थपूर्ण थांबा आहे. त्यानंतर 'बदरा'वर एक गमकदार आकार आहे. तो पूर्ण झाल्यावर फटाक्यातील अनाराच्या किरिमिजी ठिणग्या उडाल्याचा भास होतो. बिहागातील हीच तान 'आफताबे मूसीनी घेतली असती तर साऱ्या रंगाचा कसा मुष्किल विचका झाला असता! मी अनेकदा मनोमन कल्पना करून पाहिली आहे.

लतेला अभिजात संगीताचं एवढं देणं लाभलं आहे की त्याच्या भरंवशावर जे गाणं एरव्ही रोज जन्म घेऊन दुसऱ्या दिवशी मरू शकतं अशा सुगम गाण्याला तिनं पंचवीस वर्षापुरतं अमरत्व बहाल केलं आहे. सुबद्ध शास्त्रीय संगीतात हे यश सर्वच उस्तादांना लाभलं असंही समजण्याचं कारण नाही. तरी शहाण्यांना एक प्रश्न सतावतो.

लता तीन तासांची अभिजात सं ताची बैठक गाऊ शकेल किंवा ना हा तो प्रश्न. मी म्हणतो का गाऊ श णार नाही? वाऱ्यासारखा तिन्ही सप कात स्वच्छ जाऊ शकणारा आवाज गळयाची बैठकदार फिरत; लयीची अं भूत जाण आणि दीनानाथांची जन्म घरून तीन तीन उस्तादांची तालीम आणर काय हवं? तीन तास या काळाला का अर्थ नाही. तसं शास्त्राचं दळण रात्रभर होऊ शकतं. या सर्वांत रंगतीचा भा किती हा प्रश्न असतो. घड्याळ लाव दहाला सुरू होणारी पहिलीच बिलंप नेमकी घड्याळ पाहून बारालाच संप दोन तास झालेत हा त्या घड्याळीन दोष नाही. लताचं कोणतंही गाणं अ घड्याळी गाणं नाही. तिनं ते प्रत्यक्ष घड्याळीवर सुरू आणि बंद केलं त ते घड्याळी गाणं नाही. लतेचं गा घड्याळींचं श्वसन न जाणऊ देणारं गा आहे. तीन तास किंवा तितकी मिनिटं ही एक उपाधी आहे. ती जश तिच्या सामर्थ्याची ग्वाही नाही तशी तिच्याबरोबर गाणाऱ्यांची घसरगुंडी हेह तिचं खरं शक्तिस्थान नाही. तिच्य गाण्याविषयीचे काही चोखंदळ अंदाज मा त्यावरून बसविता येतील. मी तर म्हण 'किसीके मन मे आय बसे हो' अश अंतऱ्याची गेंददार ओळ वा 'दे मला चंद्रिके' मधील नोटेशनच्या लडी फेक ण्याचा ढंग आज किती जणात आहे तुलनेचं जसं कारण नाही तशी तिच्य मगदूराविषयीचे प्रश्नही अप्रस्तुतच अमीर खाँसाहेबांची संथ वजनदार किंव कुमारांची 'मुष्किल' समजल्या गेलेल गायकी लतेच्या अटकाव नसलेल्या गळय वर बसणारच नाही असं नाही. भारती संगीताची भाग्य रेषा पुढे कशी धावेल हे आजच सांगणं मुष्किल आहे. खरं आडकाठी राहील ती लतेच्या बहुवि रसिकाची. तो तिला गुलामअलींच्य वा गिरिजादेवीच्या एकच एका मार्गा जाऊ देण्याचा धोका पत्करील किंवा नाह कुणास ठाऊक. तो म्हणेल, मग 'या रखना चांद तारा' अशा सुगमाला अमर पणाचा साज कोण चढवील? अजून लते सारखी दुसरी अमरवेल तर जन्माल यायचीच आहे. जन्मेलही. पण कधी.....?

●●●





अनुक्रमणिका

*मुमताज. बाईंची छोकरी. चांगली कॉलेजात जाणारी. बाईंप्रमाणेच दर्दभरी चीजा सुनावणारी. पण उभार वयात तिच्यावर कुणीतरी प्रेम केलं इतकं की त्या प्रेमाचे अंकूर वाढत होते तिच्या पोटात ! पण...पण.. पण काय झाड तसं बीज हा निसर्गाचा नियम मानवालाही लागू पडला अं !*

# हिरवी माडी.....काळी स्वप्ने

**आज** बाईंकडे जाऊन आलो. अजून देखील बाईंनी छेडलेले ते आर्त करुण स्वर माझ्या कानात घुमत आहेत. आज अगदी कमाल केली बाईंनी. त्यांना देखील आनंद झालेला दिसला. बऱ्याच दिवसानंतर गेलं की बाईंचा ठरलेला जबाब 'क्यों हुजूर, बहोत दिनोंसे याद की हमारी ज्यों चले आये' आणि त्यांचा तो सवाल ऐकला की नुसत्या त्या सवालावर वाहवा, वाहवा, करावीशी वाटते. बाई नेहमी उर्दु काव्यातच बोलतात. त्यांनी बोललेलं प्रत्येक वाक्य म्हणजे शेरशायरीची बहारच.

आज मात्र माडी चढलो, तो बाईंचा रियाज चाललेला दिसत होता. आवाजात इतका गोडवा आणि करुणता होती की मी स्तंभित होऊन नुसता ऐकत होतो. बाईनी कोणती तरी गझल घेतली होती गायला. 'का करू सजनी आये न बालम'ची चीज चालली होती. एक सुरेख तान घेतल्यावर सुरेख अंतरा घेतला. माझ्या अंतरीच्या तारा अचानक झेडल्या गेल्या व शहारे आल्यासारखे झालं. समोर लक्ष गेलं तर सुलेमान खालीच बिडी पीत बसला होता. मी दिसताच त्याने लगबगीने बिडी विझवली आणि बावतच वर वर्दी दिली. आता मात्र जाणं आवश्यकच होतं. दिलावरकडून मोगऱ्याचा गजरा घेतला, नि मोगऱ्याचा वास घेत घेत माडी चढू लागलो. मोगऱ्याचा धुंद सुगंध बेचैन करून सोडत होता. तबीयत एकदम खुश.

वर गेलो तो झिरझिरीत पड्यातून बाई पुसटशा दिसत होत्या. परंतु आज त्यांच्या बाजूला एक सुंदरशी छोकरी बसली होती. तिचं ते लावण्य मूर्तिमंत दिसत होतं. तंबोरा खाली ठेवत ठेवत माझ्या कानावर ठराविक प्रश्नाचा शेर पडला. पडदा सारून मी बैठकीत आलो. बाईंकडे आलो की मी नेहमी स्वतःला विसरतो—अगदी धुंद वेड्यासारखा. मंद सुगंध दरवळत असतो. स्वरमालेला गवसणी घालत असतो. त्यात मीलन-सुखाचा आनंद मुक्त होत असतो. बाईंचं वय झालं असलं तरी तबीयत मात्र जवान आहे. खानदानी गायकीचा ढंग, आदब या गोष्टींमुळे मी बाईंकडे आकर्षित झालो.

"क्यों बरखुर्दार. एखादी जवान चीज सुनना है—तबीयत बस् फडक उठेगी— इसी जवान दिल की धडकन सुनिये- अंगुलीनिर्देश त्या छोकरीकडे करीत त्या म्हणाल्या—छोकरी आता अगदी स्पष्ट दिसत होती. डोक्यावरून ओढणी घेत-लेल्या छोकरीने नाकात चमकी घातली होती. मंद प्रकाशात तिची हालचाल फारच मोहक दिसत होती.

'मुमताज बेटी, सुनाओ एखादी दर्दभरी गझल—तो बहक जाये इस दिवाने का दिल- आपल्या शेरावर बाई खूप हसल्या— बाई हसल्या की अगदी निरागस हसतात. खळखळत्या पाण्यासारखं. त्यांचा तो सोन्याचा दात चमकतो. मुमताजने आता कुठे वर पाहिलं होतं. माझ्याकडं पाहिलं. नजरानजर झाली. मी थोडं स्मित केलं आणि बंदगी गेली. तिची नजर मात्र नंतर खाली गेली नि नंतर वाकूनच तिनं आदाब अर्ज केला. बाई तंबोरा लावत होत्या व निसार बंदे यांना सूचना देत होत्या. निसार तबला लावत होता. हातच्या गजऱ्याचा वास घेत घेत .मी मुमताजला न्याहाळत होतो. शिकार व शिकाऱ्यात काय ते दहा फुटाचं अंतर राहील होतं. मुमताजनं तंबोरा हातात घेतला व सूर लावण्यास सुरूवात केली. बाईंनी आतून तबक बोलावलं. कोवळ्या पानावर बाईंची अनुभवी बोटं फिरू लागली. आज पुष्कळ दिवसानी विडा रंगणार होता. असा विचार मनात आला की बाईंचं पूर्वायुष्य नजरेसमोर उभं राहतं—एखाद्या योजनेसारखं—अपूर्ण.

बाईंचं पूर्वीचं आयुष्य म्हणजे नुसतं अंगावर काटे उभं राहील असं आहे. पहिल्या भेटीतच बाई खूप बोलल्या अगदी कशाची तमा न बाळगता. तसा प्रसंग कुणावर येऊ नये—आणि आला तर................सर्वच शहारे आणणारी जीवनगाथा. शेवट गोड व्हावा ह्याची तळमळ—आस.

'साजन वाऽऽऽ सावन बीता जाय'ची ठुमरी मुमताजनं गायला सुरूवात केली होती. शिकाऱ्याचं अस्त्र गळून पडलं होतं. शिकारी समोर. मी कान देत होतो पण मन मात्र मनसोक्त घिरट्या घेत होतं— फुलपाखरानं या फुलावरून त्या फुलावर फिरावं रसगंध घेत—सगळंच काव्यमय. ठुमरी केव्हा संपली ते कळलं देखिल नाही

अशोक गोखले








लक्ष गेलं तो मुमताजच्या डोळ्यात अश्रु दाटून आले होते. मुमताजच्या आवाजाने धुंद झालेला मी मात्र अवाक् झालो. वाहवा, म्हणायचं भानच हरपलं. मुमताज ताबडतोब उठली. आपला दुपट्टा तोंडात घालून ती आत पळाली. आत धाडकन् आवाज आला–बिछान्यावर पडल्याचा आणि त्यानं हुंदक्याला मोकळं केलं. तशा बाई देखिल आत गेल्या. बाईंनी मुमताजला गोंजारलं. मायेचा मलम लावला. थोडा दिलासा, थोडी हिंमत दिली यामुळेच बाई सांभाळू शकल्या–स्वत:ला नि दुसऱ्याला.

थोड्या वेळाने बाई बाहेर आल्या. चेहरा सुकला होता. त्या तेवढ्या क्षणापुरत्या बाई म्हाताऱ्या दिसू लागल्यासारखं मला वाटलं.

"खुदा – यह जवानी किसको न दे. मर्द गिरते है ठोकर खा कर–संभल लेने को थाम लेते है दामन. लेकीन दामन को ठोकर खाकर संभलना नहीं आता.' बाई आपल्या स्वप्नात बोलल्यासारख्या बोलत होत्या. शेरशायरीसारखंच वाटत होतं त्यांचं ते बोलणं.

मुमताज त्यांची मुलगी. त्यांनी तिला या सर्व व्यापातून दूर ठेवण्याचा प्रयत्न केला. कॉलेजमधली मुमताज निसर्ग नियमाला अपवाद नव्हती. कुणी तरी तिला फसवलं होतं. प्रेमविलापानं. त्या प्रेमाचे अंकुर वाढत होते तिच्या पोटात. सर्वच भयानक – विचित्र. पण निसर्गाला तेच मान्य होतं. निसर्ग आपलं काम करणारच होता. हे असंच चालू राहणार. समाज मात्र मुमताजला दोषी ठरवणार होता. जसं झाड तसं बीज हा निसर्गाचा नियम लावणार. मानव मात्र वस्तुस्थितीचा कस लावण्याचं टाळतो. चाकोरीबाहेरचं झालं ते.

थोडा वेळ विचार करत बसलो तो मती अगदी गुंग झाली. बाईंना आजपर्यंत साद देत राहणारा मी देखिल सामाजिक बंधनाच्या गर्तेत ढकलला जातो. माधुरी अगदी मुमताज एवढीच मोठी झालेली आहे. आईची माया लाभली नसली तरी आईच्या मायेनं वाढवलं मी तिला. तसा काही विचार मनात आला की काळजाला पीळ पडतो. एकाकी जीवन जगतो आहे सारखा. कधी आग वाढली तर या बोळीकडे पावलं वळतात.

'क्यों – कोई गझल सुनेंगे' बाईंच्या प्रश्नाने मी भानावर आलो.

मी नको नको म्हटले तरी बाईंनी आग्रह धरलाच–की गझल ऐकावी. बाईंनी केलेला आग्रह मी कधी झिडकारू शकत नाही. त्यांनी घसा साफ केला. माझं मढं मात्र लोडाला टेकून बसलं होतं. मी ऐकू लागलो—

दीवानगी से काम लिया है कभी कभी
दामन किसी का थाम लिया है कभी कभी

[पान २५ वर]



*संगीताचे व्याकरणाचार्य कै. प्रा. ग. ह. रानडे यांना जाऊन दोन वर्षे झाली. उत्तर हिंदुस्थानी संगीतावरील त्यांचे संशोधन व विचार अतिशय मूल्यवान होते. संगीतावर लिहिलेले त्यांचे मराठी व आंग्ल ग्रंथ प्रसिद्धच आहेत. महाराष्ट्र-जीवन परिचय या ग्रंथात त्यांनी महाराष्ट्रातील संगीताविषयी मांडलेल्या विचारातील काही भाग येथे मुद्दाम उद्धृत करीत आहोत....*

# संगीताचे माहेर–महाराष्ट्र?

कै. ग. ह. रानडे

**महाराष्ट्रभूच्या** कंठाभरणातील संगीत हा एक विलोभनीय व तेजस्वी हिरा आहे व त्याचे तेज भूतकाळाप्रमाणेच वर्तमानकाळीहि महाराष्ट्रासच नव्हे तर उभ्या भारतास प्रकाश देऊन राहिले आहे. उत्तर भारतात तर 'तुम्ही महाराष्ट्रीय ना? मग तुम्हाला संगीत येत असणारच' अशी आजकाल जणू एक म्हणच पडून गेली आहे. याचे कारण गेल्या पाऊणशे–शंभर वर्षांत संगीताच्या शास्त्र, कला, प्रसार आणि अध्ययन–अध्यापनात महाराष्ट्रीय कलावंत आणि विद्वानांनी घातलेली बहुमोल भर हे होय.

भारतीय संस्कृति व तिची परंपरा इतकी जुनी आहे की, वेदकालापर्यंत मागे जाऊनहि तिचा उगम नेमका केव्हा व कोठे झाला हे उमगत नाही. त्यामुळे आपल्या सर्वच विद्या व कला ईश्वरप्रणित वा अनादि आहेत असे मानण्याची प्रथा आहे. संगीत हा विषयहि त्यास अपवाद नाही आणि म्हणूनच त्यास पाचवा वेद असेहि म्हटले जाते. व्यावहारिक दृष्टीने पाहिल्यासहि कोणतीहि जुनी भारतीय विद्या वा कला भारताच्या अमुक एका प्रांतात व अमुक एका भाषिकाने काढली असे सांगता येत नाही. उलट, कितीहि मागे जाऊन पाहिले तरी त्या सर्व अखिल भारतीय स्वरूपाच्याच आहेत असे दिसून येते. तेव्हा त्यांच्या इतिहासाकडे पहाण्याची आपली दृष्टि अधिक व्यापक व भरीव अवश्य आहे.

**महाराष्ट्रीय संगीताचे उत्तरेकडील पर्यटन**

इ. सनाच्या दहाव्या शतकापर्यंत भारतात स्वास्थ होते व कोणत्याहि विषयावरील ग्रंथरचना संस्कृत भाषेमध्येच करण्याचा शिष्टसंप्रदाय होता. त्यानंतर मात्र आपसातील यादवी, परचक्रे, सक्तीचे धर्मांतर आणि देशांतर यामुळे भारतापुढे जीवनमरणाचा लढा अनेक शतके उभा होता. त्यातून बाहेर पडल्यावर इतर गोष्टी! तथापि त्यातूनहि काही जुन्या विद्या व कला तग धरून होत्या. पण आक्रमकानी लौकिक धनावरोबरच या सांस्कृतिक धनाची लूट व नाश वेळोवेळी करण्यास कमी केले नाही. महाराष्ट्रापुरतेच व संगीताविषयी बोलावयाचे झाल्यास देवगिरीचा मोड केल्यावर अल्लाउद्दीन खिलजीने संपत्तीची लूट तर केलीच, पण यादवांच्या पदरच्या गोपाळ नायक या इतिहासप्रसिद्ध संगीत विद्वानास सक्तीने दिल्लीस नेले व त्याच्या रूपाने महाराष्ट्राची ही संगीत विद्या दक्षिणेतून कायमची उत्तरेस गेली व तेथेच विस्तार पावली. तेथे अमीर खुशरूने ही कला गोपाळ नायकाकडून शिकून घेतली व तिच्या आधारे आपल्या आवडीप्रमाणे काही नवे राग व वाद्ये बनवून चीज बांधणीचे काही नवे नमुने व रागविस्ताराच्या नव्या लकबी सुरू केल्या. पण यामुळे आपल्या मूळ संगीत शास्त्रात आणि पद्धतीत काही तात्त्विक बदल झाला आहे असे मुळीच नाही! उलट, अमीर खुशरूने रूढ केलेली गायकी त्या काळी प्रिय होऊ शकली नाही, असाच इतिहासाचा दाखला आहे. कालांतराने मराठी सत्तेचा विस्तार जेव्हा उत्तरेत झाला, तेव्हापासून इकडील लोकांचे तिकडे जाणे-येणे वाढले, व इकडील पुष्कळ घराणी तिकडे स्थायिकहि झाली. यातच काही महत्त्वाकांक्षी महाराष्ट्रीय तरुण कलावंत तिकडे गेले व तिकडच्या म्हटलेल्या या संगीतविद्येचे अध्ययन करून त्यात त्यानी अपूर्व यश मिळविले व गेल्या पाऊणशे वर्षापासून तिचा ओघ परत महाराष्ट्राकडे वळवून संगीत विद्येचा महाराष्ट्रात जोमाने प्रसार केला. या एकाच घटनेचा तुटकपणे विचार करणाऱ्याना ही उसनवारी वाटली असल्यास नवल नाही. पण खऱ्या अर्थाने ही उसनवारी नसून अपहरण केलेल्या धनाची





अनुक्रमणिका

सव्याज वसुलीच होय, अशी इतिहासाची ग्वाही आहे.

महाराष्ट्राच्या संस्कृतीची आद्यपिठे नासिक, नगर, विदर्भ, पैठण, देवगिरी, मराठवाडा या भागातच सापडतात. स्थल-कालदृष्टया निश्चित, आणि उत्तर–दक्षिण पद्धतीसहि सारखाच मान्य व प्रमाणभूत असा संगीतावरील अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ 'संगीत – रत्नाकर' हा महाराष्ट्राच्या अंतरंगात खुद्द देवगिरीस निर्माण झाला. खुद्द रत्नाकरातच अनेक प्राचीन संगीत ग्रंथकारांचा नामनिर्देश व वचने आढळ-तात, पण त्यांचे ग्रंथ मात्र उपलब्ध नाहीत; जे थोडे उपलब्ध आहेत तेहि फार त्रुटित आहेत.

## संगीतावरील प्रमाण ग्रंथ 'संगीत रत्नाकर' महाराष्ट्रात झाला

प्रातिशाख्यें, नारदीशिक्षा, वगैरे शिक्षा-ग्रंथ, भारतनाटयशास्त्र, बृहद्देशी वगैरे ग्रंथ संगीतरत्नाकारापूर्वीचे व उपलब्धही आहेत. पण शिक्षाग्रंथ हे वेदपठणासाठीच असून नाटयशास्त्रात संगीत विषय केवळ अनुषंगाने आला आहे. त्यात रागमार्गाचे विवरण आलेले नाही. बृहद्देशी हा ग्रंथ मात्र खास संगीतावरचा आहे, पण त्यात अनेक त्रुटी असून तो संपूर्ण स्वरूपात उपलब्ध नाही. तसेच या ग्रंथकारांचे स्थल-काळ ठरविण्यास काही साधन नाही व त्यानी वर्णन केलेले संगीतहि आज अस्तित्वात नाही. तेव्हा या ग्रंथकारांवर कोणा एका विशिष्ट प्रान्तास किंवा भाषेस, ते आपलेच ग्रंथकार आहेत असा हक्क सांगण्यास मुळीच अवसर नाही. 'संगीत रत्नाकर' व त्याचा कर्ता शार्ङ्गदेव यांची गोष्ट मात्र याच्या अगदी उलट आहे व त्यांचे स्थलकाल निश्चित आहेत. हा ग्रंथ म्हणजे आप-आपल्या पद्धतींचा आद्य व आधारभूत ग्रंथ म्हणून उत्तरादि तसेच दाक्षिणात्य संगीत विद्वान् आजहि आग्रहाने प्रतिपादितात, आणि खरी गंमत आहे ती वेगळीच ! हा ग्रंथ द्रविड देशातहि झाला नाही की उत्तरेतहि नाही. तो झाला तो देवगिरीस, महाराष्ट्राच्या ऐन अंतरंगात, यादव-वंशीय सिंघणराजाच्या कारकीर्दीत ! (इ. स. १२१०–१२४७). सातारा जिल्ह्यातील सिंघणापूरचे प्रसिद्ध देवस्थान याच राजाने स्थापले व ते त्याच्याच नावाने आजहि अस्तित्वात आहे. शार्ङ्गदेव पंडिताचा आजा भास्कर हा काश्मिरातून दक्षिणेस येऊन देवगिरीस स्थायिक झाला. त्याचा मुलगा सोढलदेव हा यादवांच्या दरबारचा श्रीकरणाग्रणी (Accountant General) होता. त्याचा मुलगा शार्ङ्गदेव. तो रसायन, वैद्यक, संगीत वगैरे अनेक शास्त्रात निष्णात् होता. त्यानेच 'संगीत–रत्नाकर' हा ग्रंथ रचला. अर्थात या पंडीताचे घराणे तीन पिढयांपासून मराठी संस्कृतीतच वाढले होते व शार्ङ्गदेवाचे बालपण व उत्तर आयुष्यहि महाराष्ट्रात व मराठी राज-दरबारीच गेले. त्याच्या काळी विप्रकीर्ण वर्गातील ३६ प्रकारच्या प्रबंधांचे गायन होत असे व त्या छत्तीसात ओवीसारख्या अस्सल मराठी गेय छंदांचा अंतर्भाव आहे व 'गीयते देशभाषया' असे त्याने तिचे वर्णन केले आहे. ओवीचे डोली, लोली असेहि पर्याय करतात असेहि त्याने आव-र्जून सांगितले आहे. ओवीप्रमाणेच धवल (धवले) वगैरेसारख्या दुसऱ्याहि काही मराठी प्रबंधांचा उल्लेख संगीत-रत्ना-करात आलेला आहे. चालुक्यवंशीय राजा तिसरा सोमेश्वर याचा 'मानसोल्लास' या नावाचा एक सुप्रसिद्ध ग्रंथ आहे. तो ग्रंथ इ. स. ११३१ मध्ये म्हणजे संगीत–रत्ना-करापूर्वीचा अर्थात त्यापेक्षा शंभर-सव्वाशे वर्षांनी अधिक जुना आहे. त्यात दोन महाराष्ट्रीय गीतें उदाहरणादाखल दिलेली असून 'महाराष्ट्रेषु योषिद्भिरोवी गेया तु कंडने' असा ओवीचा प्रबंध प्रकरणात उल्लेख आहे. यावरूनहि महाराष्ट्रातील संगीताची परंपरा किती जुनी आहे हे दिसून येईल.

## यादव काळी देवगिरी हे संगीताचे माहेरघर

यादवांचे राज्य बुडाल्यानंतर महारा-ष्ट्रास पारतंत्र्य आले, व तेथून त्याची वाताहत होण्यास सुरवात झाली. अल्ला-उद्दीन खिलजीच्या मरणोत्तर तघलख वंश आला व त्यापैकी महंमद तघलखाने आपली राजधानी दिल्लीहून देवगिरीस आणली, पण दिल्लीस बंडे झाल्याने त्यास परत दिल्लीस जावे लागले, व त्याने इकडील व्यवस्थेसाठी सुभेदार नेमला. त्या काळी या देशात प्रवास करण्यास आलेला परदेशी मुसलमान प्रवासी 'इब्न बतूता' याने आपल्या प्रवासाचे तपशीलवार वर्णन लिहून ठेवले आहे, व त्याचे सकाळ वर्तमानपत्रात खंडशः मराठीत भाषांतर प्रसिद्ध झाले आहे. दौलताबादेस तेव्हा तघलखाचा सुभेदार 'बाटलूखान' हा होता व यादवांचे राज्य जाऊन पुरी पंचवीस वर्षेहि झाली नव्हती. तो म्हणतो, "दौलता-बाद हे शहर अवाढव्य नगरी असून भव्यपणात ते दिल्लीशी स्पर्धा करील असे आहे. त्याचे तीन मुख्य भाग असून, सुलतान व त्याची फौज रहाते तो भाग म्हणजे दौलताबाद, नागरिक जन व इतर प्रजा रहाते तो भाग म्हणजे 'कटक' आणि तिसरा भाग म्हणजे 'देवगिरी'चा किल्ला. असा तटबंद व झुंझार किल्ला मला वाटते दुसरीकडे कोठे नसेल! तेथील विधर्मी (बतूताच्या मते विधर्मी म्हणजे हिंदु) मरहट (मराठे) या जमातीचे असून तेथील व्यापाऱ्यांचा मुख्य धंदा जवाहिऱ्याचा आहे. तेथे गायक व गाणाऱ्या मुलींचा जो बाजार (रहाण्याचा भाग, वस्ती) तो फारच प्रेक्षणीय, विस्तृत व बहारदार आहे." त्यांची घरे व ऐश्वर्याची तो फार वाखाणणी करतो, व पुढे म्हणतो की या पेठेच्या मध्यभागी मोठा शामि-याना बांधलेला असून तो अत्यंत भारी गालिचानी शृंगारलेला असे. त्यात दर गुरुवारी तेथील मुख्य गायक आपल्या सर्व ताफ्यासह संगीताची बैठक भरवितो व तिसऱ्या प्रहरापासून संध्याकाळपर्यंत या गायिका गटागटाने येऊन त्याच्यासमोर नाचगाण्याचे कार्यक्रम करून दाखवितात. एक विधर्मी (हिंदु) राजा या पेठेतून जाताना नियमाने या शामियान्यात काही वेळ घालवी व त्यावेळी या गायिका संगीताचे हे कार्यक्रम करून त्यास रिझवीत.





अनुक्रमणिका

# स्वर मंडळ : १



व्यर्थ !
शेरा मारून हात झटकणाऱ्यांच्या ढेकरेला
हिरवा वास येत होता.
"व्यर्थी अधिकरुचि अर्थ"...
इत्यादींचा अर्थ शोधणाऱ्या
हातानें गाणें दाखविणाऱ्यांची वर्दी लागली
तरी माना डोलावतात !
आणि मी म्हणे दर्दी !
उगाच कोण कुणाला सुरेल म्हणत नाही.
सूर सूऽऽर मारतो स्वराच्या गर्भकोषांत,
प्रयत्नांच्या प्रस्तरांत लुकलुकून चिडवणारे रेडीयम !
गाणाऱ्याची वाचा बसते.
बसणाऱ्याच टाच झिजते.
खिन्न स्वर पुन्हा एकदां निःश्वास सोडून वाट पहातो
अहिल्येच्या दगडांत.
स्वरवेडयाची लाय लागण्याची.

—अशोक रानडे

यावरून यादव दरबारची ही संगीत-शाळा असावी व त्यामध्ये नियमितपणे गायनवादनाचे कार्यक्रम चालत व ते करण्यासाठी कोणा श्रेष्ठ संगीत विद्वानाची नेमणूक करण्यात येई, व स्वतः राजे लोक त्यास नियमाने हजर राहून या कलावंतांना प्रोत्साहन देत. या गायक-गायिकांच्या वैभवाची, घराची, त्यांच्या आतील गालिचे, झोपाळे, व त्यावर पहुडणाऱ्या सुंदर व वस्त्राकारानी नटलेल्या स्त्रिया व त्याना वारा घालणारे दास–दासी यांची बतूताने विस्तारशः वर्णने केली आहेत. यावरून देवगिरीस यादवकाळी किती वैभव होते व संगीतादि कलांचा किती परमोत्कर्ष झाला होता हे स्पष्ट होते.

## महाराष्ट्रीयास शास्त्रीय संगीताची ओढ कां ?

महाराष्ट्रातील सामान्य माणसाच्या मनाला शास्त्रीय संगीताची आवड व ओढ लागण्यास तशीच कारणे घडली आहेत.

आपल्या संस्कृतीचे एक महत्वाचे अंग या दृष्टीने महाराष्ट्रीय समाज संगीताकडे पहातो. त्याचा उदरभरणार्थ कसा धंदा करता येईल ही दृष्टी बहुधा त्यात नसते, निदान आजवर नसे. संगीत म्हणजे स्वर-तालांचा नियमबद्ध, सुरेल मिलाफ व त्याद्वारा भावनाविष्कार होय. तेव्हा संगीत म्हणजे संयम, शिस्त, प्रतिभाविलास आणि आनंद! अर्थात व्यक्ति किंवा सामुदायिक जीवनास या गुणाची जोड देण्यास संगीतासारखे सुलभ साधन नाही, अशा विश्वासाने अव्वल इंग्रजीतील महाराष्ट्रीय समाजधुरीपणानी संगीताचा शिक्षण-पद्धतीतच अंतर्भाव करण्याची खटपट केली व त्याचे शिक्षण सुलभ व्हावे म्हणून नोटेशनसारख्या नवीन साधनांची निर्मिति करून संगीताची स्वतंत्र पुस्तकेही तयार केली. नोटेशनची निर्मिति व उपक्रम झाला तो प्रथम महाराष्ट्रात, ही गोष्ट संगीताच्या इतिहासात फार महत्वाची गणली पाहिजे. इ. स. १८७४ मध्ये श्री. बळवंत त्र्यंबक सहस्रबुद्धे यांच्या खटपटीने 'पुणे गायन समाज' ही संस्था निघाली व तिला पुण्यातील यच्चयावत् विद्वान्, प्रतिष्ठित व रसिक मंडळींचा पाठिंबा होता.

श्री. सहस्रबुद्धे हे मोठे रसिक, उत्साही व कार्यकुशल गृहस्थ होते व त्यांच्या खटपटीने या समाजाच्या मुंबई व मद्रास येथेहि लवरकच शाखा निघाल्या. मद्रास येथे इ. स. १८८३ साली 'ज्युबिली गायन समाज' या नावाचा पहिलाच संगीत समाज काढण्याचा आद्य मान सहस्रबुद्धे या महाराष्ट्रीय गृहस्थांना आहे, ही निःसंशय अभिमानास्पद गोष्ट आहे.

या समाजाने बहुजन समाजात गायन-वादनाचे शिक्षण देणारे वर्ग सुरू केले निरनिराळ्या शाळांना आपल्या खर्चाने तज्ञ संगीत शिक्षक पुरविले, संगीत शिक्षणा-साठी क्रमिक पुस्तके तयार करून ती प्रसिद्ध केली, चर्चा घडवून आणल्या व जयपूरच्या महाराजानी इ. स. १८००-च्या सुमारास तज्ज्ञांच्या मदतीने तयार करविलेल्या 'राधा-गोविंद संगीतसार' या दुर्मिळ ग्रंथाचे हस्तलिखित मिळवून ते छापून प्रसिद्ध केले.

इ. स. १८८० पासूनचा पंचवीस-तीस वर्षांचा काळ महाराष्ट्रातील संगीताच्या बीजधारणेचा व उत्कर्षाचा काळ म्हणून संबोधता येईल. या काळात संगीतावरील शास्त्रीय लेखन, संशोधन व प्रकाशन जोमाने होऊ लागले. निरनिराळ्या प्रकारच्या नोटेशन पद्धती वापरात येऊ लागल्या व नोटेशन पद्धतीने उस्तादी चीजांची पुस्तके प्रसिद्ध होऊ लागली. श्री. अण्णासाहेब घारपुरे यानी इ. स. १८८६ मध्ये 'संगीत मीमांसक' हे मासिक सुरू केले व त्याच वर्षी 'तालादर्श' नावाचे स्वतंत्र चोपडे प्रसिद्ध केले. सोमनाथ पंडिताच्या 'राग-विबोध' या संस्कृत ग्रंथाचे त्यानी इ. स. १८८९ च्या सुमारास खंडशः मराठीत भाषांतर प्रसिद्ध केले. इ. स. १८९४ मध्ये डॉ. भवानराव पिंगळे यानी संगीतावरील आपला एक ग्रंथ इंग्रजीमध्ये प्रसिद्ध केला. इ. स. १८९६ मध्ये पुण्याच्या 'आनंदाश्रम' संस्थेने शार्ङ्गदेवाचा 'संगीत रत्नाकर' हा ग्रंथ संपादून प्रथमच प्रसिद्ध केला. भारतीय संगीतास अशास्त्रीय व हीन ठरवू पहाणाऱ्या युरोपियन पंडितांना निरुत्तर करण्यासाठी रावसाहेब कृष्णराव देवल



अनुक्रमणिका

यांचे 'श्रुति–स्वर–सिद्धांता'कडे इ. स. १८९० मध्ये प्रथम लक्ष वेधले व पुढे त्यानी अविश्रांत परिश्रम करून तो प्रश्न 'भरत रत्नाकर' यांचे 'सारणाचतुष्टय', सोमनाथ-अहोबल यांच्या ग्रंथात आलेले स्वयंभू स्वर व तारेच्या लांबीवरून सिद्ध होणारा स्वरस्थाने यांच्या सहाय्याने सोडविला, व आपल्या म्हणण्याच्या पुष्टयर्थ आधुनिक ध्वनिशास्त्रातील तत्त्वा-प्रमाणे 'डायकार्ड'ने निरनिराळ्या रागात येणाऱ्या स्वरांच्या उंचीचे मापन करून त्यांची स्थाने कायम केली. तथापि श्रुति–स्वर–सिद्धान्त हा संगीतातील एक मोठा विविद्य विषय असून त्यावर पुढे फार मोठी रणे माजली. या सर्व वादातील निष्कर्ष काढता रावसाहेब देवल यांच्या-कडेच श्रुति-स्वर विषयाचे संशोधन कर-ण्याचे खरे श्रेय जाते व नव्या म्हटलेल्या आजवरच्या श्रुति-स्वर संशोधकांनी देवलांनी मांडलेल्याच सिद्धांताच्या, पण आपल्या नावाने नव्या आवृत्त्या काढल्या इतकेच फार तर म्हणता येईल! देवलांची कामगिरी ही मागील व चालू शतकातील जुन्या-नव्या पिढ्यांच्या संगीतव्यासंगांना जोडणारा दुवाच होता असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

महाराष्ट्रीय समाजाची अभिरुची शास्त्रीय संगीताकडे झुकण्याचे दुसरे महत्त्वाचे कारण म्हणजे उत्तरेत जाऊन गायनविद्येत निष्णात् होऊन तिकडेच स्थायिक झालेले किंवा मायदेशी परत आलेले महाराष्ट्रीय कलावंत हे उच्चवर्णीय म्हणजे ब्राह्मण होते. यामुळे संगीताकडे पहाण्याची त्यांची दृष्टी पेशापेक्षा एक विद्या किंबहुना पांचवा वेदच अशा उच्च प्रकारची होती. शिवाय सदाचरण व गुरुस आईबापापेक्षाहि श्रेष्ठ मानून, त्याची मनोभावे सेवा करावी, व पडतील ते कष्ट सोसून विद्यार्जन करावे, अशी वृत्ती महाराष्ट्रीय पिंडातच असल्याने हद्दू–हस्सूखांसारख्यानी विद्या शिकवावी तर महाराष्ट्रीय ब्राह्मणांनाच असा जणु नियमच केला होता म्हणतात!

●●●

(पान २१ वरून)

**हिरवी माडी.......काळी स्वप्ने**

हद से सिवा जो बढने लगी बेकरारियां
ऐसे में उनका नाम लिया है कभी कभी
खुद आगदेके अपने नशेमन को आप ही
बिजली से इन्तकाम लिया है कभी कभी
खुद रो दिया किसी को हंसने के वास्ते
मजबूरियों से काम लिया है कभी कभी

गझल मधले प्रत्येक शब्द माझ्या काळजाला छेदून जात होते. बाईंनी सारंच सांगितलं होतं आपल्या मुक्त शेरशायरी-तून. सारंच अद्‌भुत....

बाहेर वरेच ढग जमले आहेत. थोड्याच वेळानं सारंच कोसळेल असं वाटतं आहे. माझ्या कानात मात्र अजूनही बाईंचे ते स्वर घुमत आहेत.......
मजबूरियों से काम लिया है कभी कभी...

●●●











# स्वातंत्र्यवीर सावरकरलिखित

# ४० रुपयांचे ग्रंथ १९ रुपयांत !

स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकरलिखित

तीन श्रेष्ठ ग्रंथ

## १८५७ चे स्वातंत्र्यसमर

सावरकरलिखित मूळ मराठी प्रत

चाररंगी मुखपृष्ठ : **स्वस्त आवृत्तीची किंमत** ७.५०
मूळ किंमत सुमारे पंधरा रुपये

## सहा सोनेरी पाने

भारताची स्फूर्तिदायक विजयगाथा

चाररंगी मुखपृष्ठ : **स्वस्त आवृत्तीची किंमत** ७.५०
मूळ किंमत सुमारे पंधरा रुपये

## काळे पाणी

रोमांचक कादंबरी

चाररंगी मुखपृष्ठ : **स्वस्त आवृत्तीची किंमत** ५.००
मूळ किंमत सुमारे दहा रुपये

## तिन्ही पुस्तके एकाच वेळी

नोंदविल्यास फक्त एकोणीस रुपयात

**टपालखर्च प्रत्येकी १.५०**

**कोणतेही**
**एक अगर**
**तिन्ही एकत्र नोंदवा**

आपल्या पुस्तकविक्रेत्याकडे अगर

**मॅजेस्टिक बुक स्टॉल :** गिरगाव नाका, मुंबई ४
शनिपाराजवळ, पुणे २















अनुक्रमणिका

# भोबे



—पु. भा. भावे

**गोविंदराव** तळवलकरांनी ती वार्ता मला प्रथम सांगितली. त्यांचा चेहरा विलक्षण उतरलेला होता. मी त्यांना विचारले, "काय झाले गोविंदराव?" गोविंदराव क्षणभर थांवले आणि जड स्वरात म्हणाले, "अहो, गोपाळकृष्ण भोबे गेले." पुन्हा गोविंदराव थांबले. मग स्वतःशीच बोलल्यागत म्हणाले, "हे सगळं इतकं नश्वर आहे! अगदी काल पाहिलेला माणूस!"

—अगदी काल पाहिलेला माणूस! पुन्हा कधीही पहायला मिळणार नाही! हवा तितका भेटू शकला असता—पण पुन्हा कधीही भेटणार नाही! झर्रकन् भोब्यांची स्वच्छ, देखणी मूर्ती माझ्या डोळ्यांपुढून फिरून गेली. शुभ्र पायजमा. बगळ्याच्या पंखासारखा कुडता. वर फिकट निळे जाकीट. चेहरा तुकतुकीत. केस काळजीपूर्वक विंचरलेले. मोत्यांसारखे दात. हाड दुहेरी. उंची भरपूर. वय अद्याप चाळीशीतच रेंगाळणारे. रूप तरुण. आणि असा हा माणूस गेला! अकस्मात् हृदयक्रिया बंद पडून गेला! तार तुटली! शब्द संपले! कुंचला थांबला!

मला ते खरेच वाटेना. खरी वाटण्यासारखी ती गोष्टच नव्हती. पण घडायला नको होते. घडण्यासारखे नव्हते, ते घडून गेले होते. आपले पहिले वहिले नाटक घेऊन भोबे गोव्यात दामोदराच्या दर्शनाला गेले आणि दामोदराने भोब्यांना हातोहात उचलले. ज्या देवाचे भोबे महाजन त्याच देवासमोर भोबे गात होते. त्या त्यांच्या गाण्याला देव हा असा पावला. त्याने त्यांचे गाणेच संपविले. लिहिणे थांबविले. कुंचला हिसकाविला. खेळ आता कुठे रंगू लागला होता, तो मु
शेवटचा पडदाच पडला. अनैसर्गिक
पडला. स्वतःचे नाटक पहायला भ
मुळी जगलेच नाहीत. त्यांच्या आयुष्या
प्रयोगच मुळी अपूर्ण राहिला.

पण असे का? खरेच असे का? स्व
हौसेने लिहिलेल्या नाटकाचा निदान ए
तरी प्रयोग भोब्यांनी पाहिला असता,
काही विघडले असते का? त्यांनी आण
काही चित्रे काढली असती, आणखी का
गाणी गाता आली असती, तर का
विघडले असते का? भोब्यांचे काही
झालेले नव्हते. हे पान काही पिकले
नव्हते. मग ते अवेळीच गळून का पडले
खेळ अर्धाच का राहिला? इच्छा अपू
का राहिल्या?

ह्या प्रश्नांना उत्तरे नाहीत. असती
ती आपणाला सापडलेली नाहीत. अने
माणसांचे आयुष्यच मुळी अपूर्ण आ
अतृप्त इच्छांचे असते. त्यांची कहाण
शेवटापर्यंत कधी जातच नाही. मध्ये
तुटते. अर्ध्यावरच संपते. त्या अर्ध्या
अपुऱ्या इच्छांचे काय होते भगवान जाण
हृदयविकाराचा झटका आला, आ
मंडळी धावपळ करू लागली. तेव्हा भो
म्हणाले, "माझे दुखणे गंभीर असेल त
तसे सांगा. मला काही खाजगी गोष्ट
सांगायच्या आहेत."

पण त्या गोष्टी तुम्ही कशा सांगणा
भोबे? जन्मभर सहस्त्रावधी शब्द लिहिले
उच्चारले असाल! पण आता शब्दां
खातेच मुळी संपत आले होते! तुम्हांल
जे काही सांगायचे होते, तेही अपुरे आणि
अबोलच राहणारे होते! आपण कुठल
बोलायचे आणि काय बोलायचे, तेहं







ठरविणारी शक्ती वेगळीच आहे. आपले शेवटचे शब्द आपले आपल्यालाच ठाऊक नसतात. ह्या कहाणीची जातच मुळी तुटलेल्या शब्दांची असते. तिचा अर्थ लावायचा कुणी? आता तो अर्थ कदाचित तुमचा तुम्हांलाच कळला असेल. भाविक होतात. तुमचे समाधानही झाले असेल. कारण तुम्ही असमाधान्यापलीकडे निघून गेला आहात. कष्टी व्हायचे ते तुमच्या आप्तमित्रांनी !

मला वाटते भोब्यांची ही कहाणीच एक कष्टी कहाणी होती. ह्या कहाणीची जातच ती होती. तो सगळा आराखडा आपल्याला ठाऊक आहे. अपुरे शिक्षण. देशांतर. भरपूर श्रम. उराशी बाळगलेली काही स्वप्ने. स्वतःच्या अपूर्णतेची जाणीव. आणखी घडपड. यशाची काही चिन्हे आणि आकस्मिक साऱ्या इच्छा अपूर्ण ठेवणारा शेवट. ह्या शेवटानेच एका परीने भोब्यांनी जिंकली. माणसे जागोजाग त्यांच्यासाठी फार फार हळहळली. दोष लक्षात राहिलेच नाहीत. केवळ गुणच आठवले. पण हे गुण फुलायला आणखी आयुष्य आणि अवसर मिळाला असता तर काही बिघडले असते का? उत्तर ठाऊक नाही. गोष्ट आपल्या नैसर्गिक शेवटापर्यंत जावी अशी आपली अपेक्षा असते. पण काही गोष्टी पूर्ण होतच नाहीत. तेच त्यांचे दैव असते.

आणि ह्या विचारानेही मन विषण्ण होते. भोब्यांचे अंतरंग मला फारसे ठाऊक नाही. मी त्यांच्या अंतरंगातला मित्र नव्हतो. औपचारिक परिचयाच्या पलिकडे, पण घनिष्ठ मैत्रीच्या अलिकडे असे काहीतरी त्यांचे माझे संबंध होते. अनेक वर्षे काही एका अंतरावरून मी त्यांना ओळखत होतो. गिरगावातल्या एखाद्या बस-ठाण्यावर, गाण्याच्या एखाद्या बैठकीत किंवा वाटेने चालता चालता ते मला अनेकदा भेटले. चित्रकार दलालांचे कार्यालय ही तर त्यांची माझी भेट होण्याची एक निश्चित जागा होती. त्यांच्या धावत्या भेटीत कधी कधी मी त्यांना फार उदास पाहिले आहे. त्यांच्या औदासिन्याचे कारण विचारले तर ते म्हणत, "ढग आले आहेत. जातील." " कसे लिहावे ते मला सांगा. मला तुमच्याशी एकदा खूप बोलायचे आहे" असेही ते अधून मधून मला म्हणत. परंतु ते "ते खूप बोलणे" कधी झालेच नाही, वेळ इतक्या लवकर भरेल, ह्याची त्यांना व मलाही कल्पना नव्हती. त्यांना स्ट्रेचरवर घातले तेव्हाही "मी चांगला घडधाकट आहे" अशाच भ्रमात ते होते. सत्तेचाळीस वर्षांपूर्वी सुरू झालेले हृदय आपले शेवटचे ठोके मोजून विश्रांती घेण्याच्या बेतात आहे, ह्याची त्यांना किंवा "गोवा हिंदु असोसिएशन"च्या त्यांच्या मित्रांनाही कल्पना नव्हती. परंतु कल्पनातीत असेच काहीतरी घडले. भोबे ह्या हरहुन्नरी माणसाविषयी नुसत्या कल्पनाच करीत रहाण्याचा प्रसंग माझ्यावर आला. डहाणूकरांच्या घरी झालेल्या सुवर्णादिवच्या गाण्याच्या बैठकीत ते मला शेवटच्या क्षणी भेटले. जवळ येऊन बसले. बोलले. हे बोलणे शेवटचे आहे, ह्याची तेव्हा आमच्यापैकी कुणालाच कल्पना नव्हती. नंतर एकदम वार्ता ऐकली ती त्यांच्या मृत्यूचीच! ती वार्ता ऐकून चित्रकार दलालांसारखे सहजासहजी भावनाविवश न होणारे त्यांचे मित्र स्फुंदून स्फुंदून रडले. मी नुसता सुन्न झालो. आयुष्याच्या ऐन भरातल्या कर्तृत्ववान माणसांचे मृत्यू पाहण्याचेच काम मी गेली अडीच–तीन वर्षे करीत होतो. भोब्यांसाठी दलाल ढसाढसा रडल्याचे मी ऐकले, तेव्हा मला वाटले, दलालांचे अश्रू पाहून भोब्यांना आनंदाचे भरते येईल! आपल्या मायबोलीत चार–दोन वाक्ये उच्चारून ते आनंदाने नाचत सुटतील! दलालांसारख्यानीही रडावे, एवढे भाग्य तरी कुणाच्या दैवी असते? भोब्यांविषयी जे आणि जितके मरणोत्तर लिहिले गेले, ते वाचूनही त्यांना धन्य धन्य झाले असते. ह्या माणसाच्या ठिकाणी भाविकतेचा अंश बराच होता. परंपरेविषयी प्रेम होते. त्यांची भाविकता भाबडेपणात जमा व्हावी अशी आहे, असेही कुणी कुणी म्हणत, पण भोबे कळून–सवरून केवळ श्रद्धेमुळेच काही गोष्टी करीत. एकदा लॅमिंग्टनपथवरील पंजाबी उपाहारगृहात दलालांनी आपल्या काही मित्रांना जेवण दिले. तेव्हा काही केल्या भोबे "तंदुरी कोंबडी" खाईनात. "अरे चांगले आहे रे !" म्हणून दलालांनी त्यांना पुष्कळ समजावले. पण चवीने उत्तम अन्न व उत्तम मासे खाणारा हा चोखंदळ सारस्वत ब्राह्मण काही केल्या कोंबडीला स्पर्श करीना! शेवटी मोठ्या कष्टाने त्या कोंबडीच्या चार–दोन तुकड्यांना त्यांनी आपल्या पोटात जागा दिली. एकदा लांब सहलीला गेल्यावर ऐन तहानेल्या अवस्थेतही "मला एखाद्या हिंदूकडे पाणी प्यायला घेऊन चला!" असा हट्ट त्यांनी धरल्याचे दलालांनी मला सांगितले. असे त्यांचे काही काही हट्ट असत. त्यापैकी काही हट्टांची निर्मिती उत्तम परंपरेच्या प्रेमात होती. जुन्या मोठ्या लेखकांविषयी ते आदरभाव बाळगून असत. प्रा. ना. सी. फडक्यांवर मी लिहिलेला एक लेख वाचल्यावर ते इतके काही सद्गदित झाले, आणि इतके स्तुतिपर बोलले की माझा मलाही संकोच वाटला. परंतु त्यांचे ते बोलणे उमाळ्याचे असले पाहिजे. असेच उमाळ्याने ते गाऊ लागले. दलालांच्या कार्यालयात त्यांचे अनौपचारिक गाणे मी पुष्कळदा ऐकले आहे. परंतु आता ते गाणे संपले. बोलणे संपले. मुंबईच्या वाटा तुडवीत हिंडणेही संपले. अद्यापही गिरगाव नाक्यावर गेलो म्हणजे मला चुकल्यासारखे होते. वाटते लाखाणी पुस्तक विक्रेत्यासमोरच्या बस–ठाण्यावर भोबे कदाचित उभे असतील. निदान दलालांकडे तरी ते सापडतीलच. पण नाही. ते आता होणे नाही. दलालांच्या कार्यालयातला पंखा तसाच फिरतो. आसनेही तशीच आहेत. खालच्या मानेने दलाल तसेच मेजासमोर बसून चित्रे काढीत आहेत. पण भोबे आता तेथे येणार नाहीत. ते गेले. वेगळ्याच वाटेने व

(पृष्ठ ३१ वर)










# बहरात येऊ लागलेला चतुरस्त्र कलावंत भोबे

—मं. वि. राजाध्यक्ष

**गोपाळकृष्ण** भोबे गेल्याचे ऐकले तेव्हा अनावर विषण्णता दाटली. आपल्यावर ज्याने ओळख झाल्या दिवसापासून गाढ पण अकारण लोभाचा वर्षाव केला असा पुऱ्या बहरात येऊ लागलेला तो चतुरस्त्र कलावंत एकाएकी आणि अकाली खुडला जावा यातील विपरितपणाने बेचैन झालो. पुढे चार दिवसांनी भोबे कसे गेले याची हकीकत ऐकली आणि का कोण जाणे, ती बेचैनी आणि विषण्णता ओसरली. कसलीतरी निरभ्र शांती वाटली.एखादी उदात्त शोकांतिका पाहिल्या-वर अथवा वाचल्यावर वाटते तशी. नियतीने जणू तोवर पड्याआड, आणि पात्रांना नकळत बांधीत आणलेल्या नाटचाचा तो शेवटचा अंक अकस्मात रंगून उठला. शोकाचा निरास होऊन केवळ उदात्ततेचा भाव उरला.

असे जे हे शेवटी नाटच ठसले ते अनेक पेडांची गुंफण होऊन. त्याला कोंदणही मिळाले ते रंगभूमीचेच. भोब्यांनी जन्म-भर ज्या अनेक निष्ठा जोपासल्या त्यापैकी रंगदेवतेवरील निष्ठा ही कदाचित सर्वात ज्येष्ठ. ती लहान वयात रुजवावी हा गोमंतकाच्या मंतरलेल्या भूमीचा धर्मच आहे. तिच्या गाभाऱ्यातच जणू संगीत-निष्ठाही मग तेवू लागते. या उभय निष्ठांनी किंवा जोड निष्ठांनी, भोब्यांच्या पुढील जीवनाला आधार आणि उजाळा दिला. गावकऱ्यांनी उत्सवात चुरशीने केलेली नाटके त्या वयाला साजणाऱ्या विस्फारल्या डोळ्यांनी पाहिली, स्मरणात त्यांची पारायणे केली. त्यांनी झपाटून जाऊन पुढे त्यात कामेही केली. मुंबईत आल्यावर एका नाटक मंडळीशी व्याव-सायिक संबंध जडला तो मुख्यत: चित्रकार म्हणून. नंतर तो सुटला तरी रंग-ज्वर उतरला नाही. वाढतच राहिला. गेल्या काही वर्षांत निरनिराळ्या अंगांनी फुलून येणारी मराठी रंगभूमी जवळून आणि एकाग्र उत्साहाने निरखली. संगीत साधना तर अविरत चालू होती. मुंबईत आल्या-वर श्रवणभक्तीने त्या कलेची अनंत रूपे मनात साठवली. आणि गोमंतकीय

व एकंदरीने महाराष्ट्रीय परंपरे<br>
वळणानुसार नाटचसंगीताला पावन<br>
णाऱ्या त्याच्या रूपावर विशेष ध्<br>
दिले. या द्विविध श्रद्धेतच संगीत<br>
तानसेनावरील नाटकाचे आवाहन अ<br>
आकांक्षा होती. भोब्यांनी ती फार व<br>
मनात जपली. अन्य संगीतकारांव<br>
त्यांचे स्फूट लेखन हा जणू त्यास<br>
केलेला रियाज होता. ते नाटक हे प<br>
साध्य होते. त्यासाठी सगळ्या श<br>
पणाला लावायच्या होत्या. नैमित्ति<br>
नियतकालिक लेखनातील अपुरेपणा त<br>
चालणार नव्हता. परिपूर्णतेचा ध्<br>
होता, त्या ध्यासामुळेच लेखन पुरे होई<br>
आणि तगमग वाढली. शेवटी लेखन<br>
झाले, आणि कृतज्ञ सोहळ्याने ते कु<br>
देवतेच्या चरणी अर्पण करण्याच्या हर्षा<br>
जीवनाची समाप्ती ओढवली.<br>
समाप्तीचा सोहळा गोमंतकातील कु<br>
देवतेपुढे व्हावा यातही जन्मभर जपले<br>
एका निष्ठेची सांगता होती. कलावंत<br>
सर्वस्वाचे दान करण्याच्या रूपका<br>
नियतीने अक्षरश: अर्थ प्राप्त करून दि<br>
समर्पित, आणि समर्पित म्हणून अ<br>
झालेल्या कलासाधकाला श्रेयस गव<br>
ण्याच्या शुभक्षणीच त्याच्या आयुष्य<br>
भरतवाक्य विधीने अशा विपरीत<br>
लिहिले.

भोब्यांच्या विविध लेखनातील स्वत:<br>
कलाजीवनाविषयीच्या उल्लेखा<br>
हीच अशांती प्रत्ययाला येते. प्रति<br>
लाभण्यापूर्वीच्या काळात कित्येकदा म<br>
हानी आणि ओशाळेपण गिळून मैफ<br>
ऐकल्या. समाधान होई पण पुरेसे होई<br>
म्हणून आणखी ऐकल्या. थोर संगी<br>
कारांच्या पायाशी बसून लीनतेने रह<br>
ग्रहण केली, तरी समाधानाचा दंश रा<br>
लाच. चित्रकलेत यश आणि प्रति<br>
लाभली नाही. पण अकिंचन अवस्थेत<br>
तिचा अभ्यास मनोभावे चालू ठेव<br>
चित्रपटाचे कलादिग्दर्शक होण्याचे स्व<br>
जोपासले. अशीच आणखी किती<br>
स्वप्ने जोपासली असतील....

ती सगळी स्वप्ने सोपी, सोयीची आ









अनुक्रमणिका

व्यवहारकुशल असती तर ह्या वेड्या कलावंताला केव्हाच तुष्टी लाभली असती. पण कोणाच्या कुंडलीत ती नसते. कारण त्या कुंडलीत दुःसाध्याचा ध्यास असतो. रॉबर्ट ब्राउनिंगच्या एका कवितेतील चित्रकार म्हणतो तसे—

Ah, but a man's reach should
exceed his grasp,
Or what's heaven for?

नुसते पाय उंचावून हात पोचेल तो स्वर्ग कसला ?

अशा स्वर्गवेड्या अशांतीने माणूस अनेकदा माणूसघाणा होतो. आपल्या समाधानाच्या सावटात कुढत बसतो. दुसऱ्यांविषयी अनुदार होतो. आणि संसारातील साध्यासुध्या लावण्यांबाबतच्या अरुचीने त्याची रसिकता थिजून जाते. माणूस म्हणून भोब्यांचे मोठेपण हे की त्यांचा प्रसन्नपणा सहसा ढळला नाही. मनमोकळ्या हसण्याबोलण्याने त्यांनी अपार स्नेह जोडले. ज्यांना यश लाभले अशा भाग्यवंतांचा मुक्त गौरव केला. आणि ज्यांना यश लाभले नाही अशा उपेक्षितांच्या गुणांची कदर राखली. आणि ज्यांना अजून ते लाभायचे आहे अशा नवख्यांचे वत्सल कौतुक केले. त्यांच्या रसिकतेचा संचार सर्वांगी होता. आणि इतरांना त्यांनी त्या रसोत्सवात सहभागी केले—बोलण्याने आणि लिहिण्याने.

संगीत आणि चित्रकला यांतील भोब्यांच्या ज्ञानाची थोरवी मापण्याचा माझा अधिकार नाही. त्या कलांविषयीच्या— विशेषतः संगीतावरील— लिहिण्याबोलण्यातून प्रतिबिंबित होणारा मनोधर्म मात्र थोर कलावंतांचाच होता हे निश्चित. जुन्या साहित्यावरील त्यांची निष्ठा ही केवळ सांप्रदायिक नव्हती. तिला डोळस व्यासंगाची बैठक होती. त्याच डोळसपणाने त्यांनी आधुनिक साहित्याकडे पाहाण्याचा प्रयत्न केला. त्यातील—आणि जुन्यातीलही—जे आदरणीय वाटले त्याला मनातून सदा ओवाळले. नव्याजुन्या साहित्याचा हा अभ्यास भोब्यांच्या लेखनाच्या अंगी लागला, पण तो उसनवारीच्या किंवा अवतरणबाजीच्या रूपाने नव्हे. त्यातून जी सौंदर्ये आत्मसात केली त्याचा कस त्या लेखनात उतरला. कधी साध्या शब्दांना त्यांनी झळाळी दिली. त्यांचे बरेचसे लेखन घाईचे आणि त्रोटक पण त्यातूनही मधूनच अशा जागा चमकून उठतात की ते पिंडाने खरे साहित्यकार असल्याची जाणीव होते. त्यांच्या समृद्ध साहित्यसंचिताने त्यांना अपरंपार शब्द दिले. त्यांचे तऱ्हेतऱ्हेचे ढंग आणि नखरे दिले, पण शब्दविवेकही दिला. म्हणून संगीतासारख्या भारून टाकणाऱ्या विषयावर लिहितानाही त्यांनी शब्दांची उधळण केली नाही. आपल्याला जे सौंदर्य गवसले ते वाचकांपर्यंत पोचविणे एवढेच उद्दिष्ट त्यांनी ठेवले व त्याच्याशी इमान राखले.

•••

(पृष्ठ २९ वरून)

वेगळ्याच जागेत निघून गेले. त्या एवढ्या ऐटबाज देहाचे आता काही म्हणता काही उरले नाही. मुंबईच्या वाटा तशाच आहेत. वाटेवर काही झाडे आपल्या ओळखीची होतात. त्या झाडांच्या अंगाखांद्यावर आपण खेळत नाही. त्यांची पाने फुलेही तोडत नाही. तरी लांबूनच ती झाडे आपल्या परिचयाची होतात. आपल्या आयुष्याचा ती एक भाग बनतात. वाटते, फार जवळ गेलो नाही, तरी चिंता नाही, पण ती झाडे तेथे असली पाहिजेत. मग त्यातलेच एक छोटे हिरवे झाड नाहीसे होते. त्या झाडाने व्यापलेल्या जागेचे ओकेबोके खिंडार पाहून आपण दचकतो. उदास होतो. तसेच औदासिन्य गोपाळकृष्ण भोबेंच्या मरणाने माझ्या सारख्यांच्या मनाला येते. वाटते, हे झाड असायला हवे होते. पण हे झाड आता नाही. आणि ते नाही म्हणून तितक्याच अंशाने आपणही आता नाही !

•••














# 'समरसहि जीवन' भोबे

**दहा** वर्षांपूर्वी चित्रकार दलालांच्याकडे प्रथम श्री. गोपाळकृष्ण भोब्यांची भेट-ओळख झाली. त्यांचा प्रवेश प्रसन्नतेची नांदी होता. बोलण्या-वागण्यात ते आल्याने अनौपचारिकतेची झळाळी आली. ग. रा. कामथ तिथेच होते. त्यांनी भोब्यांना बडे गुलाम अलींची 'का कर सजनी'ची चेतावणी दिली. भोब्यांची सुटका होण्यासारखी नव्हती. आणि कुणाला नाखूष करून स्वत:ची सुटका करून घेणारे ते दिसले वाटले नाहीत. बडे गुलाम अलींची ती प्रसिद्ध 'चीज', त्या वडया गायकाच्या विशिष्ट लकबीं, वजना आणि मुलायमपणासह भोब्यांच्या कंठातून पाहता पाहता सुरावली. वास्तविक ती एक नुसती झलक होती. पण बेमालूम होती. त्यावरून चटकन् ध्यानात आले की, हा मनुष्य सूर पकडणारा आहे.

भोबे लिहू लागले तेही सुरश्री आणि सुरावर. दाद देणारे व 'वाहवा'चे त्यांचे लेखन म्हणजे साहित्यात 'बहुत अच्छा' 'क्या बात है........' हे घुसडवणारे शब्द जंजाल आहे, असे काही समीक्षकांना वाटले. परन्तु भोबे यांनी अधिकार मागितला नाही व सांगितला नाही. संगीत ऐकण्यात त्यांची श्रवणभक्ती होती आणि त्या अनुषंगानेच त्यांनी या लेखनाचे सातत्य राखले. वामनराव देशपांडे, केशवराव भोळे, दीक्षित, कै. टेम्बे, मंगळूरकर इ. इ. संगीत समीक्षकांचा दर्जा आणि दबदवा मराठी साहित्यात होता आणि आहे, तरी भोबे यांचे संगीत आणि संगीतकारावरचे लेखन आस्थेने व रूचीने वाचले जाऊ लागले. संगीताच्या ज्ञानावर हक्क न सांगणारा पण संगीतात रस घेणारा सामान्य माणूस भोब्यांचे संगीतसमीक्षण ओढीने वाचू लागला. यामुळे संगीतज्ञ, वाद्यकार इ. इ.नाही भोब्यांनी आपल्यावर लिहावे असे वाटू लागले. परन्तु भोब्यांना याने 'ग'ची बाधा झाली नाही. एकदा दलालांच्याकडे कुणाचा तरी एक चांगला लेख आला तो त्यांनी भोब्यांना वाचावयास दिला. भोब्यांनी तो लगेच बसल्या बसल्या वाचला आणि पटकन उद्गारले 'आम्ही लिहितो ते शब्द पण हे आहे खरे साहित्य!' आणि गंमत अशी की भोब्यांच्या या विनयातच त्यांचा शब्द-वेधीपणा प्रकटला.

दलालांची गाडी दुरुस्तीकरता गेली होती. मी, भोबे आणि दलाल लोकलने त्या दिवशी घराकडे परतलो. वाटेत खांडेकरांच्या साहित्याचा विषय निघाला तेव्हा मी त्यांच्या साहित्यावर टीका केली. मला कल्पना नसतानाही भोबे एकदम भडकले आणि म्हणाले, 'एक दोन पुस्तकेच ज्यांची प्रसिद्ध झाली आहेत अशांना खांडेकरांवर बोलण्याचा काय अधिकार?' मी पहातच राहिलो. भोब्यांना दुखवण्याचा किंवा खांडेकरांचा अधिक्षेप करण्याचा मुळीच हेतू नसता भोब्यांचा रोष ओढवून घेतला होता. नंतर दलाल म्हणाले, 'या करताच आम्ही त्याला भोबेच्या ऐवजी भोबडे म्हणतो.' तरी मी विचार करत होतो की भोब्यांची प्रतिक्रिया उग्र का झाली? भोब्यांचे सारे लिखाण आठवू लागलो आणि लक्षात आले की, भोबे जितके भावजीवनाचे भूकेले आहेत तितकेच ते भाव जपण्यात कट्टर आहेत. त्यांच्या श्रद्धा भावपूनित असून त्यांना धक्का लागण्याचा संशय येताच ते आरपार ताठ होतात. या प्रसंगाने साक्ष दिली की, भोबे भावभक्त आहेत.

—भोब्यांच्या नंतर लक्षात आले की, त्यांनी तसे बोलावयास नको होते. मग पहिल्याच भेटीत त्यांनी आपल्या श्रद्धास्थानाबद्दल थोडक्यात समर्थन केले. मला दुखवायचे नव्हते आणि दुखावलो असल्यास माफ करावे असे निरोगी मोकळेपणान ते संवादले. हे पण मी पहात राहिलो. त्यांचे हे दोन्ही आविष्कार मनावर ठसा उमटवणारे होते. यावरून उमजले की, हा माणूस नाती जपणारा आहे. आपल्या श्रद्धा अबाधित ठेवील आणि नातेही अश्राप राहावे म्हणून जागरण चालू ठेवील. याचा आणखीन पडताळा अगदी अलिकडे मिळाला. माझ्याकडे एका पार्श्वगायकाच्या बैठकीस मी त्यांना बोलावले. ते आले नाहीत. का आले नाहीत याचा विचार करत होतो

दा. गो. देशपांडे





अनुक्रमणिका

तोच त्यांचे पत्र आले. 'गाण्याचे आमंत्रणाचे पत्र मिळाले. गोव्याला गेलो होतो. त्यामुळे हजर राहाणे अशक्य होते. पत्रही मला परत आल्यानंतर मिळाले. एवढ्या अगत्याने तुम्ही बोलवावे आणि मला हजर रहाता येऊ नये हे माझे दुर्दैव. तुम्हांला राग येणे स्वाभाविक, पण मजवर कृपादृष्टी ठेवून आणि माझी धावपळ लक्षात घेऊन क्षमा कराल अशी आशा आहे. आता ऑफिसमध्ये येऊन भेटतो. पायावर घालून घेतो.' यावरून मनाला स्पर्शले ते असे की, भोबे मानवी नाती केवळ जपत नसत तर पूजत असत. त्यात नाटकीपणा नव्हता. अंतरीचे धावे असत.

सूर, शब्द आणि भाव यांचा अखंड आणि अविश्रांत वेध घेणारा हा स्वतःला सामान्य म्हणवणारा माणूस नेहमी तडफडीने व धडपडीने जीवनोन्मुख होता. भोबे यांना उपजत देणे जे लाभले होते ते स्वर आणि रंग–रेखा यांचे. पण प्रतिकूल परिस्थितीमुळे हे देणे लेणे ठरण्यासारखे विकास व उत्कर्ष पावू शकले नाही. पण भोबे यांचे कर्तृत्व हार मानणारे नव्हते. जे चांगले दैवी अनुग्रहाने लाभले ते न त्यजिता त्यांनी उपलब्ध तोकड्या साधनांनी व मार्गाने स्वतःला वळवले. महाकवि बोंद्रे यांनी म्हटल्याप्रमाणे 'समरसही जनन, विरसही मरण' ही त्यांच्या जगण्याची आरपार प्रेरणा झाली. या समरसतेच्याच पोटी त्यांचा निरनिराळ्या सांस्कृतिक क्षेत्रातल्या व्यक्तींचा संपर्क उद्भवला व या अविरत संपर्कातून ते अक्षरशः त्रिकाल संचारी झाले. जगणे शेवटी आहेच कशासाठी ? शुचिता, मांगल्य, सौंदर्य व पुरुषार्थ या छायेतले जे आदर्श सृजन आहे त्याचे दर्शन घेतलेझाले नाही तर जगण्यात स्वारस्य कसले? भोब्यांची तळमळ ही होती. याकरता ते दिवस रात्र पहात नसत. आचार्य अत्रे, पु. ल. देशपांडे, मो. ग. रांगणेकर, सुहासिनी मुळगांवकर, विजय तेंडूलकर, चित्रकार दलाल पासून ते त्यांच्या मृत्यूनंतर ढसा ढसा रडणाऱ्या सामान्य अज्ञात










व्यक्तीपर्यंत ते माणसांना जवळकीने व आपुलकीने भेटत राहिले. बोलत राहिले. दिलासा देत राहिले. उत्तेजन देत राहिले. नवोदित संगीतकार असो किंवा प्रख्यात व मान्य कलावंत असो, याबाबतीत भोबे तरतम करत नसत. सकाळी एखाद्याला भेटायचे, नंतर एखाद्या संगीत मैफलीला हजर राहायचे व पुन्हा रात्री अशाच एका मैफलीला जायचे. असाच दिवस उगवायचा आणि संपायचा पण भोबे सत्र चालू असे. शरीर धर्माला बाध यायचा. जागरणे आणि हिंडणे याने पडलेला ताण इच्छा शक्तीच्या प्रबल सामर्थ्यात लोपून जायचा. भोबे यांना मलावरोधाचा त्रास होता. त्यांच्या दैनंदिनीत त्याचा त्रास व्हायचा पण भोबे रेचक घ्यायचे. स्वच्छ व्हायचे आणि तरतरीत राहायचे. वयक्तिक जीवनाचे आतून पोखरणारे सल जीवनाच्या या अनिवार बतावणीत कुणाच्या (एक दलाल, तेंडूलकर सारखे वगळता) फारसे लक्षात आलेच नाहीत. संगीत, शब्द आणि भाव यांच्या दिव्य दर्शनाच्या ध्यासाने वेडावलेले भोबे अशा टप्प्याला आले की, ते जीवनाचा सूर पकडू पाहत होते. म्हणूनच त्यांच्या वागण्या-बोलण्या आणि लिहिण्याला एक अवीट व अजोड गोडी येत चालली होती. तसे पाहता वर्तमानपत्रात विशिष्ठ स्तंभलेखन करणारे पुष्कळ असतात व आहेत. पण 'महाराष्ट्र टाईम्स' मध्ये भोबे यांचे जे संगीतावर लेखन येत होते ते निनावी असून भोब्यांचे म्हणून सर्वश्रुत होते. ठळक व सनसनाटी बातम्यांना टाळून तेच वाचणारा वाचक वर्ग तयार झाला. नव्हे तो भोबे यांनी तयार केला म्हटल्यास ते मुळीच अतिशयोक्तीचे वाटू किंवा ठरू नये. आज तर अशी स्थिती झाली आहे की, भोबे गेल्या नंतर तसे वाचावयास मिळत नाही एवढीच उणीव जाणवत नसून तसे आता पुन्हा वाचावयास मिळणार नाही अशी कायम रुखरुख लागून राहिली आहे. यात एक अद्वितीय अशी करुणार्द्र गोम आहे. संगीत, संपर्क आणि संचार या माध्यमावर आरुढ होऊन भोबे जो ज नाचा तरल सूर अंगिकारत होते त्यांच्या शब्दांना, आविष्काराला आगळे ओज तेज आणू पहात होता.

—यामुळेच भोबे यांच्याकडे व त्यां साहित्याकडे ('चतुरंग रेखा', 'स स्वरश्री', 'मासे आणि मी', 'शा गंधर्व', 'धन्य ते गायनी कळा'—तानसे वरचे नाटक) मराठी मन आकृष्ट ह चालले होते. एक माणूस आपल्या व्यक्ति मत्वाला एकीकडे लयीचे वळण लाव जे अतीत आहे ते पकडण्याच्या प्रक्रि व अभिव्यक्त करण्यात आत्मविस होत चालला होता. हे तो स्वतःचे र देऊन करत होता. अशा अवस्थेत ए क्षण असा आला की, ज्या देवळाचे महाजन होते तिथे आपले नाटक अर्प करून ते तृप्तीच्या व क्षणकाल कृ कृत्यतेच्या समाधानात डुंबत असता त्यांनी देह टेवला. पारंपरिक भाषेत अ म्हणण्याचा मोह आवरत नाही क देवाला वाटले, 'आपला माणूस आपल जवळ आनंदात आला आहे. मागायल नाही द्यायला आला आहे. पुन्हा कदाचि अशा अवस्थेत येथे येण्याचा योग येणा नाही. अशा माणसाची सत्वपरीक्षा अजू काय पहायची? आताच तो आपल्य दैवी गंधर्वनगरीत राहण्यास पात्र आहे आता त्याला परत जाऊ देऊ नये.....'

—देवांची दुनिया संपन्न झाली आणि मानवी दुनिया मात्र पोकळीकडे शोक व्याकूल होऊन पहात आहे!

●●●


















## एकजुटीने संकटावर मात करू !

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई.








अनुक्रमणिका

सापडल्याबद्दल हळहळ व्यक्त केल्याशिवाय तो कधी राहिला नव्हता ! शेवटी एक बैठक त्याच्याच बिऱ्हाडी ठरली. 'नाट्य-निकेतन'च्या काळोख्या हॉलच्या एका कोपऱ्यात भोब्याच्या लेखनाचा संसार मांडलेला असायचा. काटकोनात मांडलेल्या दोन मेजांवर पुस्तकं, कात्रणं, कागद, रद्दी, रंग, ब्रशेस, पत्रं, आमंत्रणं डायऱ्या, वह्या, खडू, पेन्सीली, असा पसारा असायचा आणि त्यांच्या आड उघडाबंब भोबे धोतराचा शेव खांद्यावर टाकून बसायचा. तिथेच आमची काळोखात बैठक रंगली. त्याच्या जीविताची अघळपघळ बखर मी ऐकू लागलो.

जिथली मातीसुद्धा अबीरगुलाल आहे त्या देवभूमी गोमंतकात भोब्याचा जन्म झाला. पणजी बंदराच्या समोर बेती गाव आहे. बेतीच्या सागरी अंगाला नेरुल हे हिरवेगार खेडे विसावले आहे. तेच भोबे घराण्याचे गाव. मडगावजवळच्या जांबवली गावाचा श्रीदेव दामोदर हा भोबे घराण्याचा कुलस्वामी. भोबे पिढीजात व्यापारी. त्यांचा अरबांबरोबर गोमटा, भुरटा आणि चोरटा अशा तिन्ही अंगांनी व्यापार चालायचा. त्यामुळे लक्ष्मीची कृपा पोटभर होती. मग भोबे घराण्यात जन्मलेल्या मुलाने इतरांसारखं शिकायचं ते कशाला ? सावंतवाडीची वेस ओलांडून अन्नाच्या आशेने आलेल्या मास्तरांच्या समोर मंडपीत किंवा गोठ्यात बसून चार मराठी चोपड्या चाळल्या की पिढीजात अरबी व्यापार उदीम पुढे हाकारण्याइतकं ज्ञान हे मिळतंच. शिवाय अक्षर ओळख झाल्यामुळे नाटकाची वही हातात धरून देवापुढे जत्रेत नाटकाचा खेळ घालण्याइतपत पोरं तयार होतातच. मग आणखी शिकून डोकेदुखीला निमंत्रण का द्यायचं ? ह्या अशा विचारधारेने वेष्टी-लेली नेरुल गावाची सामाजिक रचना होती. आणि आपली अरबी घोडी वाळवंटं चरण्यासाठी मागे टाकून गोव्याची हिरवीगार कुंपणं चरायला आलेल्या अरबी व्यापाऱ्यांच्या घोळदार झग्यात बांबू, वासे, नळे, गवत, लाकूडफाटा, असलं असेल-नसेल ते नगदी उत्पन्न बांधून देऊन ढबूच्या ठिकाणी रुपया सव्वारुपया कमावणं, हा तर त्या घराण्याचा हातचा मळ होता. साहजिकच, शाळेला फाटा देऊन भोबे अरबी व्यापाराच्या निमित्ताने पोर्तुगेज तुरुंगापासून राजप्रासादापर्यंत पैरवी करून आला ! ह्या व्यापा-राच्या अनुषंगाने त्याने अरबी भाषेचं व्यवहारापुरतं ज्ञानही कनवटीला लावून घेतलं—हातात पाटीपेन्सील न घेता.

भोबे कुटुंबात शंभर माणसांचा राडा होता. हा सर्वात धाकटा. म्हणून गोपाळकृष्ण झाला. घरातला प्रत्येक भोबे जाग आल्यापासून स्वतःच्या इष्ट देवतेची उपासना तारस्वरात करू लागायचा. दिवसभराच्या व्यवहारावर रात्री भोजनोत्तर भागवताच्या वाच-नाची साय धरायची. हे सगळं कानी पडून पडून भोब्याचं जुन्या मराठी वाङ्मयाचं प्राथमिक ज्ञान सिद्ध झालं. ज्ञानेश्वरांपासून कृष्णंभट बांदेकरांपर्यंत आणि रामदासांपासून जुवेंच्या तुकाराम-बावा वरद्यांपर्यंत सर्व उपासकांच्या रचना, आरत्या, स्तोत्रं, सवाया भोब्याला तोंडपाठ होत्या. पाच मिनीटांच्या उभ्या उभ्या

**मुंबई नभोवाणीवरील श्री. रवींद्र पिंगे हे भोब्यांचे एक निकटवर्ती. त्यांनी भोब्यांना अतिशय जवळून न्याहाळले. त्यांच्या सहवासात राहून त्यांनी जमा केलेल्या माहितीच्या आधारे रेखाटलेले भोब्यांचे हे निकट दर्शन.**

भेटीतसुद्धा तो रामदासांनी राजयोग्याचं केलेलं घोटीव वर्णन खण-खणीत शब्दात ऐकवी. हे पाठांतर पुढे पुढे फार वाढलं. गेला बाजार पाच दहा नाटकं तर त्याला त्यातल्या कंसातल्या मजकूरासकट पाठ होती. हातात पुस्तक न घेता भोबे प्रॉम्टींग करायचा ! हे सर्व कशाचं फळ आहे असं मी त्यांला विचारलं तेव्हा तो गहिवरून म्हणाला, "अरे, ही माझ्या आईची कृपा ! ती निरक्षर होती. पण ज्ञानेश्वरीचा अर्थ लावायची. संतवाङ्मय तिच्या जिभेवर विरघ-ळायचं. ते उठतावसता माझ्या कानी पडायचं." आणि भरीस भर म्हणून नेरुल गावाच्या पंचक्रोशीत वस्तीला आलेल्या फिरत्या किर्तनकारांनीही भोब्याला प्रसाद वाटलाच. किर्तनकारबुवाचं चातुर्य भोब्याने नीट टिपलं, ज्याचा त्याला पुढे हुन्नर वाढवताना उपयोग झाला असावा. किर्तनकारांची वाणी तर कानावर वज्रलेप झालीच. प्रसंग मारून नेणं, मुद्रा प्रसन्न राखणं, आवश्यक तितकंच पांडीत्य करणं, उपकथानकांचा खजिना सतत उपसत राहाणं, आणि बेताचं गाणं ऐकवणं, ह्या पट्टीच्या हरदासाच्या पंचविद्या, भोब्याने आत्मसात केल्याचं अलीकडच्या पाच सात वर्षांत घडीघडी दिसून यायचं.

नेरुल गावच्या शांतादुर्गेच्या उदार कृपेच्या सावलीत भोबे वाढू लागला. व्यापार उदीम पाहू लागला. देवीच्या जत्रेत नाटके घालू लागला. तशात तो संगीत हिरो झाला. म्हणजे शुभकार्यातला आंब्याचा टाळाच म्हणायचा. जत्रेतल्या नाटकात काम करायचं त्याचं हे वेड अगदी कालपरवापर्यंत धगधगत होतं. दरसाल ग्राम-देवतेच्या जत्रेतल्या नाटकात छबी रंगवून उभं राहायचं आणि देवासमोर सेवा रुजू करायची हे व्रत त्याने सालोसाल कटाक्षानं पाळलं. पण हा लेखकमाणूस नाटकात सोंग घेतो, गातो, हातवारे करतो, हे त्याच्या सुविद्य लेकीला मुळी खरेच वाटेना. शेवटी तीन वर्षांमागे भोबेने तिला गावी नेलं आणि 'स्वयंवरा' तल्या कृष्णाच्या सोंगात उभं राहून बेफाम गर्दीवर गारुड करीत असलेल्या आपल्या बापाला तिने डोळे भरून पाहून घेतलं ! ह्या कठोर व्रतपालनात भोब्याने आण्णा किर्लोस्करांपासून औंधकरांपर्यंत अगदी कुणालाही दयामाया दाखवली नाही. आणि नाही म्हटलं तरी गोव्यात नाटकाच्या बाबतीत कुणीच कुणाला दयामाया दाखवीत नाही. धर नाटक की कर नाटक, हा तिथल्या लोकराज्यातला अलिखित कडक कायदा आहे. खेळ रंगवा, गोवेकर तुम्हाला डोक्या-वर घेतील; कामात कसूर करा, गोव्यातले झाडून सारे रंगमंच तुम्हाला बंद झालेच म्हणून समजा ! नुसत्या लौकीकाच्या मुंडा-










## आंब्याला जसा मोहोर तसा

# भोब्याला गहिवर!

—रवींद्र पिंगे

**भोबे** गेला. त्याच्या आजुबाजूला वावरणाऱ्या आम्हा सगळ्या-नाच स्वतःची काहीतरी हानी झाल्यासारखं वाटलं. बातमी वाचून सगळे बधीर झाले. भोब्याने अनेकांना लळा लावला होता. मृत्यूची अतर्क्य झेप पाहून सारे जागच्या जागी थिजले. भोबे गेला म्हणजे एक भला माणूसच संपला असं ज्याला त्याला वाटलं. भोबे माझा स्नेही होता. त्याच्या घरी मी जेवलो वावरलेलो होतो. म्हणून मी त्याची टिंगल करायचा. मात्र सर्वच दोष माझा नव्हता. भोबेचं वाग-णंही चौघाजवळ चार तऱ्हेचं असायचं. तो अगदी आशेलाही येई, आणि मयूर बने. त्याला स्तंभलेखन करावं लागल्यामुळे आणि त्याच्या-वर त्याचे पोट असल्यामुळे त्याला पवित्रेही घ्यावे लागत. त्याला ही चमत्कारीक परिस्थिती कळतही होती. जिकडे आपण निघालो आहोत तिकडे आपण चाललेलो नाहीत हे त्याने मनात ओळखलं होतं. पण ठरल्या ठिकाणी अनवाणी चालत जायला जी किंमत द्यावी लागते, ती देण्याची त्याची ऐपत नव्हती. भरीला, भोबे चाललाय तो नीटच चाललाय अशी समजूत असलेली भोळी मंडळी त्याच्या बाजूला दिंडीत उभी होती. भक्तांचे भजन त्याच्याने मोडवेना. शिवाय आम्हांलाही चेष्टेला विषय हवा होता. बरं, भोबे एकसारखा भेटायचा नि एकाच भेटीत निरनिराळे अवतार दाखवायचा. परवा आकाशवाणीवर आला होता. तसा तो अधून मधून चकरा टाकीच. परवा तो आल्यावर आमच्या एका कलावंतावर सरळ डाफरायला लागला. म्हणाला, "तुम्ही उठल्या बसल्या स्वतःची नावं बोंबलता, नि आमची उपेक्षा करता. एक जात हरामखोर आहात तुम्ही !" मग एका मुलीला म्हणाला, "अग, तुझी कुंडली आहे तुझ्याजवळ ?" तिच्याकडे नव्हती. तेव्हा आवाजात पराकाष्ठेचं आगत्य गोळा करीत त्याने तिला सांगितलं, "असं कर. तूं कुंडली घे. ती पर्समध्ये टाकून ठेव. मी गोव्याहून परत आलो म्हणजे तुझे समग्र भविष्य सांगेन हं." मग तो तिसऱ्याकडे वळला. तिसरा म्हणाला, "भोबे, कामगार सभेसाठी संवाद लिहीतोस काय रे ? शंभर रुपये मिळतील आयते !" ते बोलणं भोब्याने कोटावरची धूळ झटकावी तसं झटकून टाकलं. तिथून पुढच्याच क्षणाला एका अधिकाऱ्याजवळ आपुलकीने म्हणाला, "बाई, आता लक्ष ठेवा आमच्याकडे !" मग माझ्याजवळ अ नि कानाला लागत म्हणाला, "+++ ला वाटतं भोबे पै साठी करतोय. अरे, पण माझी पुण्याई उदंड आहे हे ह्य कुठाय माहीत ? ह्या जगात दोन-अडीचशे रुपयांना मला क मरण नाही !"

भोबे असं वेगवेगळं बोलायचा. कानात वारा शिरल्यासा भसाभसा लिहायचा. आज ह्याचा परीचय, उद्या त्याचा परीच परवा आणखी कुणाचा, असं सारखं चाललेलं असायचं. जत्रेत पाळण्यासारखा तो गरगरत होता. सर्वांना प्रसिद्धी देत हो रविशंकरांपासून सरकारी कचेरीच्या सत्यनारायणापुढे गायले सामान्य गायकापर्यंत प्रत्येकाला पुढे-पुढे लोटीत होता. भोब्याचे काय'? त्याच्याविषयी कुठे चार चांगल्या ओळी छा आल्या नाहीत की कुणी त्याला प्रसिद्धी द्यायचे मनावर घे नाही. गोमंतक साहित्य संमेलनाचं सोन्याचं पदकही त्य पटकवलं. त्याच्या हिशोबी त्याने तलवार मारली. पण त्या दोन ओळींची बातमी करून सगळे कृतकृत्य झाले. त्याच मर्दुमकीचं कुणालाच काही वाटलेलं दिसलं नाही. मी त्या ह्याबाबतीत हटकलं, "भोब्या, लेका तू सर्वांबद्दल इतकं ग काढून लिहितोस नि तुझ्याबद्दल सगळ्यांच्या कानी सात खडे अरे, अजून तरी जागा हो– एकदा स्वतःकडे बघ !" त्या विषण्ण हास्याचं ऊन उधळीत तो म्हणाला, "मग तूच लिही ! म्हणजे प्रकरण पुन्हा माझ्याच गळ्यात आलं ! बरं, मला नाही म्हणवेना कारण भोब्याचं अन्न पोटात होतं. विमलताईंच्य हातच्या मासळीची चव मी विसरलेलो नव्हतो. नि शिवा आमच्या दोघात एक मायेचा पाश होता. आम्ही दोघेही सारस्व होतो. आम्हा दोघांचीही गोमंतक ही देवभूमी होती. मास आम्हा दोघांनाही देवासमान होती. आम्ही दोघंही कमीअधि फरकानं चाचपडत होतो. नाटक कंपन्यांमधल्या शतपावल्या त आमच्या पाचवीलाच पुजलेल्या होत्या. खोताच्या वाडीत शिरतान "गोपाळकृष्ण" अशी लांबलचक हाक रस्त्यावरून मारल्याशिवा मी कधी पुढे झालो नव्हतो आणि मी आकाशवाणीच्या कैंची





अनुक्रमणिका




**परवा कोणी वादंगले**
**पूरियाचा निषाद तीव्र नाही.**
**मी म्हणालो बोकडाची दाढी कापून**
**शेळी तयार होत नाही.**
**गोडव्यांत घोळला तरी तीव्र टोंकरतोच.**
**पर्वताएवढा आ करून**
**सुईसारखा निषाद लावावा.**
**पांगाऱ्याची बी सुंठेंत उगाळून**
**निखाऱ्यासकट गिळावी.**
**असे केल्यानें काय होते ?**
**होणाऱ्याची जान जाते**
**करणाऱ्याची मान रहाते**
**उगाच कशाला वाद !**

**—अशोक रानडे**

वळचा बांधून वेळ साजरी करू म्हणाल, तर ते मुंबई-पुण्याकडे पचेल; गोव्यात नाव काढू नका. गोव्यात नाटक्यांचा रुपया बंदा हवा. म्हणून गोवेकरांचे खेळ फक्कड होतात. कलेशी इमान चोख राखतात म्हणून गोवेकर कलावंत कीर्तिमंडित होतात; म्हणूनच श्री मंगेशीच्या देवळातल्या समया घासणारा मुलगा, मास्टर दीनानाथ ह्या रूपात मराठी रंगभूमीचा चिंतामणी होतो, संगीताचा चक्रपाणी होतो आणि अलम् रसिकांचा कंठमणी होतो; म्हणूनच नाट्यलेखनाची उर्मी यायला गुर्लहोसूरच्या आण्णा किर्लोस्कर नामे कष्टम कारकुनाला गोमंतकाच्या पुण्यभूमीवरचा नाटकी संजिवक वारा अंगाखांद्यावर घ्यावा लागला. त्या चैतन्यमय शक्तिशाली वाऱ्याने अगोदर त्यांची फुफ्फुसं भरली. नंतर ते नाटकाने भारले गेले. अशा त्या गोमंतकाच्या भूमीवर नादिष्ट संगीत नट बाळकोबा बावडेकर कायमच्या वास्तव्यासाठी डेरेदाखल झाले. त्यांची आणि भोब्याची गाठ पडली. ह्या वस्ताद बावडेकर-बुवांनी भोब्याला शास्त्रोक्त संगीताचा श्रीगणेशा घालून दिला. आधीच कांकडा; त्यावर हे तेल पडले. परीणाम : गायनवादनाचा पिसाट लोळ उठला. पिढीजात व्यापारउदीम घरात चाललेलाच होता. मात्र निव्वळ यदृच्छेने सगुण उपासना चालू होती ती नाट्याची, शास्त्रीय संगीताची, नाट्यसंगीताची. भोबे पछाडला गेला. वाण्याच्या पोराच्या हातात वीणा पडावी ह्यापरते दुर्दैव ते कोणते? घरात चिडचिड सुरू झाली. घरंदाज मंडळींना भोब्याचा हा नवा नाद रुचेना. आणि नादावीण भोब्याला जन्म सुना वाटू लागला. कुरकूर सुरू झाली. भांडयाला भांडे लागले. शाब्दिक वार झाले. काही वर्माला झोंबले आणि —

—आणि काळीज भारून टाकणारी गोमंतकाची ती देवभूमी, त्या भूपाळ्या, त्या आरत्या, ती कथाकिर्तने, त्या मंतरलेल्या जत्रा, जत्रेतली नाटके, ती बाळबोध मातापितरे, देवदेवळे, ती झ त्यांच्या त्या गार सावल्या, ते वस्ताद बावडेकरबुवा, ते त्यांचे णारे गाणेवजावणे, उदरंभरणाची यथेच्छ सोय करणारा तं व्यापार – ते सारे सारे मागे टाकून एका टळटळीत दुपारी भोबे भाऊच्या धक्क्यावर हजर झाला. बरोबर आणलेला जाम शून्य ! फक्त गळयात सूर शाबूत होता, हातातले वादनाचे लखलखीत होते, आणि हृदयात देवावर गाढ विश्वास होता. शालेय शिक्षणाचा पुरता बट्ट्याबोळ झालेला आहे आणि पैशांऐवजी गायनवादनकळाच तेवढी बांधलेली आहे, अश मुशाफिराला ह्या मायपोट मुंबापुरीत एक नाटकमंडळी तर दुसरं कोण आधार देणार ? एकाकी अवस्थेत मुंबईच्या उतरायचं, जोगळेकराच्या हॉटेलात पावमिसळीचा नास्ता उरक पांग्याच्या क्लासात वळकटी टाकायची आणि कुणातरी व नाटक्याचं गरजू बोट धरून रंगपटात मास्तरांचं धुलीवंदन सोंग रंगवायला बसायचं हा मराठी रंगपीठाचा अस्सल भोब्याने सहीन्सही गिरवला. मात्र जराशी वाट वाकडी भोबे परळपर्यंत पोहोचला नाही. गिरगावातल्या सेंट्रल f समोरच्या टेलर कंपनीच्या वालावलकरांच्या आधाराला र तिथून बेचाळीस साली रांगणेकरांच्या 'नाट्य-निकेतन' चिकटला. कंपनीच्या भरभराटीच्या काळात भोबे कंपनीत अ त्याचा सुभग भाग्ययोग. नाटककार, कलाकार, वादनकार, कार ह्या साऱ्यांचेच कंपनीत बरे असताना भोब्याचे तिथे बसले. पैकी ह्या सर्वांत मोठा लाभ म्हणजे बाहेरच्या जगात प्र पाडलेल्या, पण आतून प्रकाशू लागलेल्या पु. ल. देशपांडे सुरती रुपयाशी त्याची कंपनीत गाठ पडली. देशपांड्यांचे दैवत मंगेशीला. म्हणजे गोमंतक ही त्यांची देवभूमी. साहि रेशमी धागे जुळत गेले. अष्टौप्रहर त्यांच्या संगतीत राहिल आणि मुद्दलात भोबेला उमेद असल्यामुळे, भोब्याची बहु वाढली. भोब्याच्या सहवासाचा देशपांड्यांना त्या काळी झाला नसेलच असे म्हणवत नाही. गेला बाजार पचपन्नास कोंकणी वाणं भोब्याने त्यांच्या कानापर्यंत टीकाटिपणीसह पोहो असणारच, कारण तसल्या आख्यानांना भोब्याकडे तोटा न देशपांड्यांच्या सहवा ले ते सोनचाफ्याचे दिवस आठवून गहिवरायचा. त्यांना गुरुस्थानी लेखायचा. नाटक मंडळीच्या बि बिस्तरा अंथरल्यापासून गुरुभक्तीचे हे भन्नाट वारे त्याच्या संचारले. नाटक मंडळीत त्याने सगळ्या विद्या चाचपल्या. रंगवले, मुखडे रंगवले, तबले बडवले, ट्रकवर सामान च कशाला नाही म्हटले नाही. हातात चोपडी न धरता प्रॉ करणारा भोबे हा मराठी रंगभूमीवरला पहिलाच जिग प्रॉम्टर असावा ! कंपनीवरोबर त्याने बारा बावड्यांचे चाखले; अनेकांच्या मनगटातले पाणी जोखले. कंपनीच्या परगा मुक्कामात त्याने गावोगावच्या स्थानिक लेखक-कलावंत ओळखी अगत्याने करून घेण्याचा आणि त्यांना आपल्या ओ अट्टाहासाने पटवून देण्याचा परीपाठ ठेवला होता. जे श्रेष्ठ





अनुक्रमणिका

वाटले त्यांच्या चरणकमली दंडवत घातले. पण वगवशिल्यासाठी नव्हे; उमाळ्याने. आणि गहिवरपूर्वक.

कंपनीत भोब्याचा गुरुसंप्रदाय फोफावला. मात्र गुरु अवधूतांसारखा तो वज्रकाय ब्रह्मचारी राहिला नाही. नाटक मंडळीच्या बिन्हाडीच त्याच्या अंगाला हळद लागली. कु. विमल चिटणीस हिने भोब्याच्या उजाड आयुष्यातले वनवास पर्व संपवले, नाटक्या भोबे गृहस्थाश्रमात, अनेकांचे करडे विरोध न जुमानता, दाखल झाला. संतोषाची गोष्ट होती की हातावर पट असलेल्या त्या मर्दाने आपला औटका संसार मोठा गोड करून दाखवला. संसारात त्याने निखळ आचारशुद्धी आचरून दाखवली. भोबे घरात आपल्या मुलीला "बाळा ऽऽ" अशी इतकी कोवळी हाक मारायचा की ऐकणाऱ्याचे कान तृप्त होत. एकुलती एक मुलगी कु. विद्या हा आमच्या ह्या घरेलू मित्राचा जणू केशरी पंचप्राणच होता ! आवर्जून सांगितलं पाहिजे की भोबे मुळात गोवेकर, तशात नाटकवाला, नि भरीला भटक्या-सुद्धा. पण इतके दुवे जमूनसुद्धा भोब्याच्या संसारनिष्ठेबद्दल कुणा-चाही कधीही गैरसमज म्हणून कसा तो झाला नाही.

"मौजे" साठी भोबे चविष्ट मजकूर पुरवू शकणार नाही असा भागवत बंधूंचाही गैरसमज झाला नाही. भोब्याच्या अंगची चतुर कला त्यांनी हेरली. भोबे भागवतांकडे लिहू लागला. मोठ्या रसाळ गप्पा नेमाने मारू लागला. ते पायेय पाठंगुळीस मारून तो पाध्यांच्या "नवशक्ति"त लिहू लागला. आपल्या जन्मजात दिलदार-पणाने पाध्यांनी भोबेंच्या बोरूकामाला खूप वाव करून दिला. पुढे अचानक सत्यकाम विद्यालंकार भेटले. भोबे रसाळ हिंदी गद्य लिहू शकणार नाही असा त्यांचाही गैरसमज झाला नाही. त्यांनी विनवले. ह्याने लिहून काढले. होय, हिंदी लिहिले. मराठी प्रमाणेच चांगले ठळक लिहिले. पुढे सराव झाला. वृत्तपत्रसृष्टीशी मैत्र्य जुळले. जोडीस रेखाचित्रांचा सराव केला. 'नवनीत'ने आधार दिला. 'दीपावली' तर घरचीच होती. ह्या सर्वांच्या आपुलकीचा जुईमंडप बहुरूपी भोब्यावर सावली करता झाला. ह्याच सुमाराला तो अकाशवाणीवर पदंही गावू लागला. श्रुतिकेत काम करून बहार उडवू लागला.

भोबेचं कलम बहरून आलं. तो सपाटून तावबंद लेखन करू लागला. लेखनाचा ना कधी कंटाळा केला की ना केलं कधी कंटाळवाणं लेखन. तमाम वाचकांना मानवलेला आणि इतरांना न जमलेला कलाजगतावर प्रकाशझोत टाकणारा रम्य लेखनप्रकार त्याने निवडला आणि 'महाराष्ट्र टाईम्स'च्या स्तंभामधून लिलया राबवला. इंग्रजी बेतास बेत यायचं. त्याचा उत्कृष्ट परिणाम म्हणजे तो मोठं प्रासादिक बाळबोध मराठी लिहू लागला. गायनवादन-

नाट्यादि कलाप्रकारावर समीक्षणात्मक असूनही प्रासादिक सुभग लेखन करणाऱ्यांमध्ये भोवे उजवा ठरला. खरे तर तो कुठल्याही विषयावर मोठे चवदार लिहू लागला. गोष्टी तर त्याने लिहिल्याच. पण घमणीत फेसाळणाऱ्या सारस्वती रक्ताशी इमान राखून त्याने मासळी ह्या लज्जतदार विषयावर "मासे आणि मी" हे मुलखावेगळे चटकदार पुस्तक श्रद्धेने लिहून दाखविले.

दैनिकांतून नाव झाल्यावर भोवेने लेखन हा जणू आपला पेशाच केला. त्यामुळे त्याचा फायदाही झाला नि तोटाही झाला. नाव झालं, सरकारी वर्तुळात प्रवेश झाला, आशीर्वाद देण्याइतपत पत आली, चार पैसे मिळू लागले, हा फायदा. पदरी गरजुपण आलं, वेगवेगळे पवित्रे घ्यावे लागले, हा भयानक तोटा. त्याने हे ओळखलं होतं. लोक आपली स्तुतीच का करतात हे न कळण्याइतका तो भोळा नव्हता. तो म्हणायचा, "रंगवलेल्या चेहेऱ्याचे सगळेच लोक मुके घेतात !" हा शेरा निव्वळ विनोदी नव्हता. पण तो रेटत राहिला. गायनवादनात त्याच्या हिपूट जीवाला विरंगुळा लाभू लागला. शेकडो दुर्मिळ चीजा त्याने बहुत खस्ता खाऊन मिळवल्या. त्यांची सरगम तयार केली. केसरबाईंपासून रविशंकरांपर्यंत सर्वांच्या दरबारात त्याची पैरवी मर्मज्ञ म्हणून होऊ लागली. त्यांच्या कला-निर्मितीचे उन्मेष पाहून त्याचं मन ओलं झालं; आनंदाचा द्रोण झाला. आमच्या व्ही. आर. आठवले ह्या अस्सल गायकीच्या क्षेत्रात तडजोड न पत्करणाऱ्या घराणेदार गायकाशी त्याने कौटुंबिक स्नेह जोडला.



आठवले वहिनींना तो बटाटयाची गोवेकरी पद्धतीची भाजी करायची त्याची जिव्हाळ्याने संथा देऊ लागला. भविष्य तर [illegible] अक्षरशः हजारो जणांचे वर्तवून टाकले. पं. बाळकृष्णबुवा इचल[illegible] जीकर, वझेबुवा, गंगुबाई वगैरेंचे पर्वताएवढ्या मेहनतीचे [illegible] तो होतकरू तरुणांना सांगू लागला. गहिवराची त्याला उपजच [illegible] पुढे ती विस्तारत गेली. बडेगुलामअली, पं. रविशंकर आणि भिमसेन जोशी ही त्याची अविचल श्रद्धास्थाने झाली. ह्या स[illegible] त्रयींविषयी तो गदगदून गहिवरे. दलाल– बोरकरांबद्दलही असाच भावनाविवश होऊन बोले. श्रावणसरी जशा माती[illegible] वासाशिवाय संभवतच नाहीत, तसा हा भोवे गहिवराशिवाय [illegible] संभवेच ना ! मात्र त्याचा गहिवर हा साहेबांच्या उंबरठ्य[illegible] घातलेले लाचार लोटांगण नव्हतं; समर्थांच्या गाभाऱ्यास[illegible] कृतज्ञ मनाने घातलेला तो उमाळ्याचा साष्टांग दंडवत होता. प्र[illegible]शाली कलावंतांबद्दल कौतुकमिश्रित गहिवर हा त्याचा स्वधर्म हो[illegible] **झाडाला जसा मोहोर, तसा भोव्याला गहिवर !**

होता होता भोव्याच्या नावावर पाऊण डझन ग्रंथ जमा झ[illegible] तो मराठीतल्या ग्रंथकारांच्या ओसरीत वर्ग झाला. तो आप[illegible] आगामी पुस्तकाबद्दल बोलू लागला. सगळीकडून त्याला स्तुति[illegible] पत्रं येऊ लागली. तो परीक्षक म्हणून हिंडू फिरू लागला. पण तरी काही तरी राहून गेलं आहे, हेही त्याला कळू लागलं. ब[illegible] लागलं. निव्वळ स्तंभलेखनाने तारू तडीस लागणार नाही, हे त्या[illegible] उमगायला लागले. तो कथालेखन घटवू लागला. पण इष्ट [illegible] भेटेना. त्याच्याकडून त्याने दिशा चाचपडून पाहिल्या. जो जो [illegible] जावं, तो तो मतलबी लोकांचंच कडं भोवती पडू लागलं. [illegible] चक्रावून गेला. ह्या चक्रव्यूहातून बाहेर पडणं भाग होतं. तां[illegible] फुटण्याची तो वाट बघू लागला.

आपण कधीकाळी नाटक लिहू आणि नाटककार होऊ ह्या[illegible] भोवेला कल्पनाच नव्हती. वर्तमानपत्रातले स्तंभलेखन आ[illegible] कलावंतांबद्दलच्या आठवणीवर आधारलेल्या आख्यानासारख[illegible] गोष्टी हेच त्याचं श्रेय ठरलं होतं. 'दीपावली' मासिकाच्या ए[illegible] खास अंकात त्याने 'रामतनु मिश्र' नावाची एक गोष्ट लिहिल[illegible] त्या चविष्ट गोष्टीत एका चांगल्या नाटकाची बीजं आहेत हे भोव्या[illegible] मित्रांनी त्याच्या लक्षात आणून दिलं. मग टाळाटाळ करीत, कानेटक[illegible] सारख्या मातबर नाटककारालाच ती कथावस्तू पेलायला सांग[illegible] सांगत, दलालांच्या आग्रहाखातर भोवे ते नाटक लिहायला बसल[illegible] तानसेनाच्या जीवनावरचे संदर्भ ग्रंथ त्याने जमवले. बळेबळें करी[illegible] त्याने पहिला अंक रेटला. नंतर लेखनाला कुलूप बसले. पुढचा भा[illegible] सुचेना. सुचलाच, तर रुचेना. लिहून होत नाही नि सोडवतही नाहं[illegible] अशी कुचंबणा झाली, तेव्हा भोवेने देवाचा धावा सुरू केल[illegible] घरातल्या दामोदर ह्या कुलस्वामिनीच्या तसबीरीसमोर तो अनुग्रह[illegible]साठी लोटांगणे घालत सुटला. ही कुतरओढ आता केवळ देव[illegible] थांबवू शकतो, बुद्धी तोच पल्लवीत करू शकतो, अशी त्याची खात्[illegible] झाली. करता करता त्याचं नाटक पुरं झालं. दामोदर देवाने आपल[illegible]



अनुक्रमणिका

शब्द ऐकला ह्याचा त्याला कैफ चढला. नाटकाचं नाव त्याने ठेवलं, **"धन्य ते गायनी कळा !"**

नाटक पुरं झाल्यावर नाटककार कुठे जाणार ? नाटककंपनी-कडेच. त्याप्रमाणे अठ्ठावीस जानेवारीला त्याने गोवा हिंदु असोशि-एशनमध्ये फोन करून आपण लिहून झालेल्या नाटकाचे हस्तलिखित घेऊन प्रत्यक्ष वाचायला येत असल्याचे कळविले. असोशिएशनची मंडळी दुसऱ्या दिवशी मद्रासच्या दौऱ्यावर निघत होती. त्यांची बांधाबांध होत होती. तेव्हा त्यांनी भोबेला टेलीफोनवरून सांगितलं की नाटकाचे वाचन दौऱ्यावरून परत आल्यावर करू. दामोदर देवाच्या प्रसादाने उन्मळून आलेल्या भोब्याला तेवढा धीर निघणे शक्य नव्हते. नाटकाची वही कांखोटीला मारून अठ्ठावीस जानेवारीलाच रात्री भोबे असोशिएशनच्या बिऱ्हाडी हजर झाला. रामकृष्ण नाईक, मोहनदास सुखटणकर, भिकू पै आंगले, गुडे, मणेरीकर वगैरे मंडळी तिथे त्याच्या तावडीत सापडली. नाटकाचे अथपासून इतीपर्यंत दणक्यात वाचन झाले. वाचन संपल्यानंतर भोब्याने सुटकेचा निश्वास टाकला आणि सुखटणकरांकडे वही भिरकावून देऊन म्हणाला, "आता ह्याचे तुम्ही काय वाट्टेल ते करा रे !"

दौऱ्याहून परतल्यावर नाटकाचे पुन्हा वाचन करायचे त्याच बैठकीत ठरले.

असोशिएशनच्या पुढ्यात एक चांगला योग दुसऱ्या बाजूने जमून आला. गोव्यात नाट्यसंमेलन भरत होते. 'लेकुरें'चा प्रयोग तिथे होणार होता. मद्रासचा दौरा आटोपून 'रायगड', 'मत्स्यगंधा'ची मंडळी बेळगावपर्यंत, म्हणजे गोव्याजवळ त्याचवेळी येणार होती. कानेटकरांचे जिजाईच्या जीवनावरले नाटक घालायचे असोशिएशनने नक्की केले होते. तेव्हा, असे जर आहे तर कानेटकरांसकट सर्व कलावंतांनी गोव्यात जमावे असे त्यांनी ठरवले. असोशिएशनच्या नाटकमंडळीचे बिऱ्हाड प्रत्येक दौऱ्याच्या वेळी मडगावला असे. जांबवली मडगावपासून पंधरा मैलांवर आणि जांबवलीचा दामोदर हे मडगावचे ग्रामदैवत. तेव्हा, असा अनायासे योग चालून आला आहे म्हणून दामोदरदेवासमोर समस्त कलावंत मंडळींनी भजन करून हरिकृपा संपादावी, कृतज्ञतापूर्वक देवाची आठवण ठेवावी आणि सर्वांचे कल्याण करण्याचे अंतरीचे गाऱ्हाणे त्याला ऐकवावे, असा असोशिएशनने बेत ठरवला. सर्वांना तो पसंत पडला. सुखटणकर भोबेला म्हणाला, "अरे, तू चल की गोव्याला. तुझ्याही नाटकाचं पूजन करून टाकू !" भोबेलाही अनायासे चालून आलेला हा बेत पसंत पडला. असोशिएशनने त्याची निघण्याची व्यवस्था केली. सर्वांनी बारा फेब्रुवारीला मडगावला जमायचं ठरलं. भोबेला हायसं वाटलं.

अखेर आपण नाटककार झालो, गडकरी-देवलांची नि आपली जात एक झाली, देवाचा आपल्यावर उत्तम अनुग्रह झाला, ह्या भावनेने कृतकृत्य झालेला भोबे म्हापशाचं नाट्यसंमेलन गाठण्याच्या हेतूने दोन दिवस अगोदरच गोव्यात हजर झाला. सर्वांना आगत्याने भेटला. बोरकर कवींपुढे त्याने कबुलीजबाब दिल्यासारखी आपल्या

## पुष्कळ दिले, पण घेतले मात्र काही नाही

कै. गो. कृ. भोबे यांची अल्पकालीन् मैत्री असलेला एक वैद्यकीय व्यावसायिक असा मी त्यांच्या स्मृतीला आदरांजली अर्पण करीत आहे.

संगीताने आमचा परिचय घडवला त्या आधीच 'तब भी बोला' या त्यांच्या लेखाने माझं मन त्यांच्याकडे आकर्षिलं गेलं होतं. दादर माटुंगा सोशल क्लबचा चिटणीस असल्याने क्लबच्या गायनवादनाच्या कार्यक्रमांचे समीक्षण करण्याकरिता मी त्यांना आवर्जून बोलावीत असे आणि तेही मोठ्या आनंदाने आणि प्रेमाने येऊन सोपविलेलं कार्य योग्यरीत्या पार पाडीत. समीक्षणात आपल्या टीकास्त्राची धार विशेषतः नवीन व होतकरू कलावंतांच्या प्रगतीच्या वर्मी बसणार नाही याची ते फारच दक्षता घेत आणि नेमक्या त्यांच्या या सद्भावानेच मला मोहून टाकले. परिचयाचे रूपांतर फारच वेगाने गाढ मैत्रीत झाले. संगीत आणि अनुषंगिक विषय आणि व्यक्ति यावर बोलताना ते इतके रंगत की वेळेकाळाचं भान रहात नसे. "डॉ. मी पुन्हा वेळ काढून तुमच्या फुरसतीच्या वेळी तुमच्या घरी येईन. आपण खूप खूप बोलू" असे ते नेहमी म्हणत आणि आमची दवाखान्यातील चालू बैठक तुटे. अशी रंगतदार बैठक कधीच घडू शकली नाही, हे माझे दुर्दैव !

गेय संगीत, वाद्यसंगीत, नाटक आणि नाट्यसंगीत, नृत्यकला, चित्र व रंगकला, साहित्य आणि कुंडली–विज्ञान अशा अनेक विषयांत त्यांनी वाचनाने, चर्चेने, मेहेनतीने आणि अनुभवाने उत्तम साधना केली होती, तरीदेखील 'प्रत्येकापासून अगदी लहानापासूनदेखील आपणाला काहीतरी शिकण्यासारखे असते ही विद्यार्थी-वृत्ति त्यांचेमध्ये होती. त्यांचं लेखन साधंच, पण प्रासादपूर्ण आणि प्रवाही होतं. लेख वाचायला घेतल्यानंतर संपल्याशिवाय पुस्तक बाजूला ठेवणे दुरापास्त होई.

थोर गायकांबद्दल लिहिताना त्यांनी लिहिले आहे की हे गायक "शापित गंधर्व" काही काल या पृथ्वीवर वास करण्यास आले होते. कै. भोबे या पुण्यात्म्याचं अल्प आयुष्य, त्या अल्पशा आयुष्यात त्यांनी केलेली अनन्यसाधारण विविध कलोपासना आणि साधना आणि त्याचं आपणामधून क्षणार्धात् अवचित जाणं, या घटना पहाता कै. भोबे हे एक शापित गंधर्व आपणांमध्ये काही काल वास्तव्य करण्याकरिता आले होते असे वाटते. आपल्या कलासंपन्न आयुष्यात कै. भोब्यांनी मला, त्यांच्या अनेक मित्रांना आणि सर्व मराठी समाजाला 'पुष्कळच दिले आहे, परंतु घेतले मात्र काही नाही' हे शल्य मनाला कायमचे बोचत राहील. त्यांच्या अल्प वास्तव्याच्या सुगंधित स्मृतीच आता आपणाजवळ शिल्लक राहिलेल्या आहेत. ईश्वरेच्छा बलीयसी! परमेश्वर त्यांच्या आत्म्यास चिरशांति देवो हीच प्रार्थना !

–डॉ मा. धुं. फळणीकर









अनुक्रमणिका

जीवनाच्या घडणीची हकीगत मांडली. बांदीवडयाला महालक्ष्मीच्या दर्शनाला गेला. घराणेदार गायकीसाठी आपली जिंदगी पणाला लावलेल्या तिथल्या वृद्ध गायिका गिरीजाबाई केळेकरांना भेटला. ज्योत्स्नाबाईंना भेटला. संध्याकाळ झाली, तेव्हा तो जांबवलीला हजर झाला. असोशिएशनची मंडळी त्या अगोदर तिथे कानेटकरांच्या नव्या नाटकाच्या वही पूजनासाठी आलेली होतीच. त्यांनी भोब्याला जवळ बोलावले. पण भोबे देवाच्या दरबारात आल्याबरोबर पालवून निघाला ! कुणाचेही न ऐकता त्याने तडक दामोदर देवाची धूळ भेट घेतली आणि आपली नाटकाची वही देवासमोर ठेवली. भक्त देवाच्या ऋणातून मुक्त झाला !

असोशिएशनने पूजेचे कर्मकांड पुरे केले.

रात्री दहाला देवाची पालखी निघाली. पेट्रोमॅक्सच्या बत्त्या लागल्या. पालखीला साठसत्तर कलावंत जमले. इतके कलावंत भजन करणार म्हणून मडगावचे नागरीकही जांबवलीला आले. तीस पस्तीस मोटारी जांबवलीला येऊन उभ्या राहिल्या. डॉक्टर मंडळीही आगत्याने आली.

पालखी निघाली. आमच्या गोव्याच्या प्रथेप्रमाणे पालखी पाच पाच पावलांना थांबत थांबत प्रदक्षिणा पुरी करते. ह्या प्रत्येक थांबण्याला 'पेणी' म्हणतात. प्रत्येक पेणीला भजन म्हटले जाते. व्ही. जी. भाटकर, गंधर्व कंपनीचे ऑर्गन वाजवणारे अनंतराव लिमये, श्रीपादराव नेवरेकर, कथालेखक व. पु. काळे वगैरे असोशिएशन-तर्फे आलेली कलावंत मंडळी गायन वादन करून देवाची सेवा करू लागली. पालखी पुढे पुढे जाऊ लागली. अभंग म्हणण्याचा भोबेला आग्रह झाला. त्याने तिकडे कानाडोळा केला. इतरांची सेवा समजून घेत होता. अखेर प्रदक्षिणा संपून पालखी देवळात जाण्याच्या अगोदरच जो मुक्काम होता, त्या मुक्कामात देवाची सेवा करण्याचे भोबेने मनावर घेतले. सुखटणकरांच्या मांडीला मांडी लावून तो बसला नि त्याला म्हणाला, "दरबारी राग म्हणजे काय चीज आहे ते आता ह्यांना सुनवतो !" मग त्याने श्रीपादराव नेवरेकरांच्या डोक्यावरची फरची कॅप काढून स्वतःच्या डोक्यावर ठेवली आणि "जुडीवर जुडी" हे गाणं म्हणायला सुरुवात केली. सुरुवात तर छान झाली. श्रीपादराव नेवरेकर भोब्याला साथ करताना वरच्या पट्टीत सूर लावू लागले. त्यामुळे भोबेला त्या न पेलणाऱ्या पट्टीत ग[illegible] लागले! पण आला प्रसंग त्याने धकून नेला. गाणे अर्ध्यावर अ[illegible] तेव्हा त्याने आपल्या डोक्यावरची फर कॅप काढून नेवरेकरांच[illegible] डोक्यावर होती तशी ठेवून दिली ! भोब्याची सेवा संपल्या[illegible] नेवरेकरांनी "घुंगट के पट खोल" हे भजन सुरू केले. ते च[illegible] असतानाच भोबे सुखटणकराला म्हणाला,

"अरे, माझ्या पोटात दुखतंय."

"गॅसची कळ आली असेल रे. जाईल." सुखटणकर म्हणा[illegible]

ते तेवढयावरच राहिलं. भजन चालूच होतं. दोन तीन मिनि[illegible] गेल्यावर भोबे पुन्हा सुखटणकराला म्हणाला,

"माझ्या डाव्या दंडात पेटके येताहेत." सुखटणकर चरक[illegible] त्याने भोबेला उठवून शेजारच्या अग्रशाळेत नेले. मोठ्या प्रयास[illegible] पेला मिळवून त्याला पाणी पाजले. भोबेने ढेकर दिला. पण [illegible] वाटेना. सुखटणकराने पालखीला आलेल्या डॉ. काणे, डॉ. फोंडे[illegible] आणि डॉ हेडे ह्यांना बाजूला बोलावून घेऊन सर्व प्रकार सां[illegible] तला. त्यांनी भोबेला उचलून देवळासमोरच्या मोटारीत ने[illegible] तिथे तो अधिकच अस्वस्थ झाला. सुखटणकराला पुन्हा म्हणा[illegible] "हा गॅस निघून गेल्याशिवाय मला बरं वाटणार नाही." धाव[illegible] करून औषधोपचार होऊ लागले. वेदना कमी करण्याचं इंजिक्श[illegible] दिलं. त्याचा फायदा झाला. वेदना कमी झाल्या. अस्वस्थ झालेल[illegible] भोबेला घेऊन मोटारी मडगावच्या इस्पीतळाकडे निघाल्या. पा[illegible] खीतल्या कुणालाच झाला प्रकार कळला नाही. भोबे मडगावच[illegible] दिशेने निघाला, तेव्हा नेवरेकर टाहो फोडत होते, "जोहार, मा[illegible] बाप जोहार !"

मडगावच्या इस्पीतळात आपल्याला स्ट्रेचरवरून नेता[illegible] ह्याचा भोबेला अचंबा वाटला. हा हृदयविकाराचा झटका आहे क[illegible] म्हणून त्याने विचारले. आपले मनोगत बोलून दाखवायचे अ[illegible] असेही म्हणाला. पण तोवर परीक्षा झालेली नव्हती. रीत[illegible] कार्डीयोग्राफ काढला. डॉक्टर म्हणाले, "हृदय नीट काम देत नाह[illegible] दिसतंय."

त्यांचे शब्द हवेत विरतात न विरतात तोच नर्स म्हणा[illegible] "डॉक्टर, खेळ संपला !"

काही सेकंदातच गोपाळकृष्ण भोबेचा आत्मा पंचतत्त्वात विल[illegible] झाला !

योगायोगाची गोष्ट अशी की नेमक्या त्याच वेळी जांबवली[illegible] दामोदर देवासमोरचं भजन संपलं होतं. सर्व कलावंत देवा[illegible] गाऱ्हाणं घालीत होते. इतक्यात देव गृहातला दिवा एकाए[illegible] भडकला आणि विझला. कलावंतांनी काळोखातच आपलं दे[illegible] समोरचं गाऱ्हाणं संपविलं !







# भोबे–पत्ररूप दर्शन



आमचे मित्र, दीपावलीचे एक सुहृद आणि मराठीतील एक नामवंत लेखक, दर्दी संगीतकार नि चित्रकार श्री. गोपाळकृष्ण भोबे यांचे गोव्यातील जांबावलीच्या श्री दामोदराच्या मंदिरात भजन करीत असताना देहावसान झाले. त्यांच्या अचानक निधनाने मुंबापुरीतील त्यांच्या कुटुंबियांना दुःखाचा जबरदस्त धक्का बसला. भोब्यांचे विविध क्षेत्रांतले अनेक मित्र नि हितचिंतक तर या वार्तेने अक्षरशः किंकर्तव्यमूढ झाले. दीपावलीची कचेरी भोब्यांचे नित्य नियमाचे विश्राम धाम. त्यांचे–आमचे हितसंबंध साऱ्या साऱ्यांना ज्ञात होते हे जाणून त्यांच्या कित्येक मित्रांनी आमचेकडे पत्ररूपाने, तारा पाठवून व दूरध्वनीवरून त्यांच्याप्रतीच्या शोक वेदना व्यक्त केल्या. आमचेकडे आलेल्या अशा काही पत्रांतील हृदयस्पर्शी, मार्मिक परिच्छेद मुद्दाम येथे देत आहोत. यावरून त्यांना भोबे यांच्याबद्दल केवढा जिव्हाळा, आदर आणि गाढ आपुलकी वाटत होती याची चांगलीच कल्पना येते.

– संपादक

●

दीपावलीच्या ताज्या अंकातले तुमचे आणि जितेंद्रांचे भोब्यांविषयीचे हृदयक्रंदन वाचून माझा गळा पुन्हा एकदा दाटून आला. भोबे म्हणजे धावते वारे. नेहमीच घाईत असायचे. पण गोव्यात आले की मला भेटायला कधीच चुकत नसत. चाललो असे सांगण्यापुरते यायचे पण त्या चार क्षणांत जीव लावून जायचे. या खेपेला मात्र स्टेशनवर आधी फोन करून आले, आणि आले ते उत्साह आणि आल्हाद उधळीत. त्यांची मुद्रा मला विलक्षण तजेलदार दिसली. मी त्यांना तसे म्हणालोही. तेव्हा म्हणाले, इतके दिवस फार दगदग केली आता सर्व ठीक आहे. आणि मी सुखावलो आहे. माणसाच्या अजाण मनाला मृत्यूची चाहूल आधी लागलेली असते की काय कोण जाणे पण ज्या गोष्टी तसेच कारण घडल्याशिवाय माणूस कुणाला सांगत नाही. आपल्या जीवनातल्या कितीतरी गोष्टी त्यांनी मला सांगितल्या. आपल्याला गोपाळकृष्ण नाव कसे पडले या गोष्टीपासून आपण पत्नीची आणि मुलीची आर्थिक काय तरतूद केली आहे या गोष्टीपर्यंत.

त्यांच्यावर अकस्मात घाला आला. असे मरण भाग्याचे. ही खरी सायुज्य मुक्ती. मला त्यांच्या या भाग्याचा हेवा वाटतो. जेष्ठांचिया आधी कनिष्ठांचे जाणे, तसा प्रकार झाला आहे. इतका भक्तहृदय, गुणोपासक आणि गोड गोवेकर मला आढळलेला नाही. दोन पिढ्यांमधला संस्कृतीचा दुवा निखळून पडला आहे.

**– बा. भ. बोरकर, गोवा**

●

मित्रवर्य गोपाळकृष्ण भोबे यांच्या निधनाची भीषण वार्ता ऐकून सुन्न झालो.

त्यांच्या मृत्यूने साहित्याची व संगीताची केवढी हानी झाली व त्यांच्या संबंधितांना व स्नेह्यांना केवढा चटका बसला आहे हे मी वर्णन करायला हवे असं नाही.

दीपावली प्रकाशनास व त्या सभोवतालच्या तुम्हा–आम्हा मित्रांच्या वर्तुळाला भोब्यांची उणीव फारच जाणवेल. तुमचे या विषयातले दुःख मी जाणू शकतो. भोबे सावलीसारखे तुमच्या मागे असायचे, घरच्याच सारखे स्टुडिओत वावरायचे. दीपावलीबद्दल एकेक योजना चर्चिताना अन्तर्बाह्य उमलून यायचे.

दीपावलीतल्या विशेषतः दिवाळी अंकातल्या माझ्या कथांचा पहिला वाचक मला वाटतं भोबेच! आपण तिघांनी रंगवलेल्या मैफली आता नुसत्या मनात घोळवायच्या.

**–अरविंद गोखले, मुंबई**

●

भोबे गेल्याची वातमी रेडिओवर ऐकली नि अक्षरशः दिङ्मूढ होऊन गेलो. जीवन अशाश्वत आहे वगैरे खूप ऐकत आलो होतो पण भोब्यांच्या बाबतीत नियतीने दाखविलेले क्रौर्य संताप जनक आहे.

जीवनात काही स्थैर्य लाभावे यासाठी त्यांनी अपार काबाड कष्ट केले. अनेक प्रकारची कामे केली. पण शेवटपर्यंत नशीब त्यांच्याशी पाठशिवणीचाच खेळ खेळत राहिले.

**–सदानंद रेगे, मुंबई**

●

भोबे यांच्या आकस्मिक निधनाचे दुःखद वृत्त वाचले आणि वाईट वाटले.

भजन करता करता ते स्वर्गस्थ व्हावेत हे त्यांच्या दैवी वृत्तीला साजेसेच होते.

थोडी पोटाची तक्रार. काही पथ्ये ते आवर्जून पाळीत पण एरव्ही त्यांची प्रकृती तर ठीक होती. मग असे कसे झाले? हुरहूर लागली आहे.

तुमचा एक सात्विक निकटवर्तीय निमाला. तुमच्या डोळ्यांना धीर नसेल. काही काही माणसांचा सहवास हा स्वयंभूच सुगंधित








असतो. तुमचे भोबे या जातीचे होते. तुमच्यामुळे त्यांचा माझा स्नेह. मला हा गृहस्थ नेहमी आवडत असे.

**—अनंतराव कुलकर्णी,** पुणे

●

नियतीच्या डावपेचांचा थांग मानवी मनाला अनाकलनीयच असतो. भोबे यांच्या निधनाने काळाने आमच्यातून एक बहुढंगी व विलोभनीय व्यक्तिमत्व हिरावून नेले आहे. गोमंतकातील एका विशिष्ठ काळात ते वाढले होते. परंतु ते गोमंतकातील जुनी व नवी पिढी यामधील एक दुवा होऊन राहिले होते. त्यांच्यासारखा दुसरा गोमंतकीय भविष्यकाळात मिळणे मुष्कील आहे. त्यांची रसिकता व प्रतिभा अव्वल दर्जाची होती.

त्यांचे गोमंतकावर नितांत प्रेम होते आणि त्यांची प्रवृत्ती भक्तिमार्गाची होती. त्यांचे निधन गोमंतकात आणि ते सुद्धा ईश्वराचे गुणगान आळविताना व्हावं हा विचित्र योगायोगच नव्हे काय !

**—सुरेश आमोणकर,** गोवा

●

दीपावलीतील काळ्या चौकटीतला 'शापित गंधर्व' वाचून डोळे पाणावले. भोबे आपल्या सर्वांना इतक्या लौकर सोडून जातील असे वाटले नव्हते. माझा व त्यांचा जुना परिचय होता. आता आता तर ते मित्र झाले होते. गेल्या काही वर्षांत नागपूर विदर्भातील जनतेशीही त्यांनी स्नेह जोडला होता. संगीताच्या क्षेत्रातील टीकाकार म्हणून त्यांनी आपले स्वतंत्र स्थान निर्माण केले होते. ती जागा भरून काढणारा दुसरा टीकाकार आजच्या पिढीत असावा असे वाटत नाही. निदान श्री. भोबे यांच्या तुलनेचा तर नाहीच नाही !

**—यशवंत शास्त्री,** नागपूर

●

दीपावली मासिकाचे आपले सहकारी कै. गोपाळकृष्ण भोबे यांच्या आकस्मिक निधनाने एक चांगला सहकारी गेल्याचे कळल्यावर धक्काच बसला. आपण 'महाराष्ट्र टाईम्स'मध्ये त्यांचे यथातथ्य दर्शन घडविले आहे.

**—पंडित महाजन, मुंबई**

●

दीपावलीच्या अंकातील "शापित गंधर्वा"स वाहिलेली श्रद्धांजली अतिशय भावपूर्ण व हृदयस्पर्शी आहे.

श्री. भोबे यांचा आमचा अल्प परिचय पण एका भेटीतलाच आणि त्या भेटीतच तो चिरपरिचिताचा व सुहृदभावाचा प्रत्यय आला. त्यामुळे त्यांच्या अकस्मात मृत्यूने चटका लावला. त्यांच्या 'नाद' ला बक्षीस मिळालं हे वाचून दुःखमिश्रित आनंद झाला.

**—सौ. यमुना शेवडे,** नागपूर

●

भोब्यांच्या मृत्यूने मराठी साहित्य सृष्टीचे हृदय गलबलून गेले आहे. दीपावलीची जी मैफिल जुळत असे त्यात कितीतरी सूर आता कमी पडणार आहेत. सांत्वन हे अखेर शब्दच असतात व तेच आता शिल्लक राहिले आहेत.

**—आनंद साधले,** मुंबई २९

●

रात्री घरी आलो आणि घरातल्या मंडळींनी नभोवाणीवर ऐकलेली दुःखद बातमी मला सांगितली.

खरंच का! काहीच सुचत नाही. हा दुष्टावा दैवानं असा का साधावा? काहीच कळत नाही. वळत नाही. हृदय सारखं आक्रंदन करीत म्हणत आहे, "भोबे, तुम्हाला असं तडकाफडकी इतक्या लौकर जाण्याचं काही कारण नव्हतं. —आता पुन्हा केव्हा भेटणार आहांत?" शब्द! . . . अपुरे . . . गोव्यावर अमर्याद प्रेम करणाऱ्या भोब्यांनी अखेरच्या क्षणातही गोव्यातच जावं हा दैवी योग. काहीच सुचत नाही . . . .

**—प्र. श्री. नेरुरकर, मुंबई**

●

भोबेंचा व माझा परिचय दीपावली कार्यालयातच झाला. कोकणीमधून तुमचे चाललेले प्रेमाचे वाद ऐकताना मौज वाटे. त्यावरून तुम्हा उभयतामध्ये असलेल्या प्रगाढ स्नेहाचे प्रत्यंतर येई. दीपावली कचेरीत त्यांची दुपारची भेट सहसा चुकायची नाही. त्यांचे वर आढ्याकडे पाहात प्रश्न विचारणे, सिगारेटचे झुरके घेण्याची विशिष्ट लकब, मध्येच आदल्या दिवशी ऐकलेल्या मैफलीतली मनात घोळत असलेली तान घेणे, त्यांचा झब्बा जाकीट हा नेहमीचाच पोशाख हे सारे सारे डोळ्यांसमोर उभे राहते. त्यांच्यासारख्या रसिक, मर्मज्ञ कलावंताला "देवाचिये द्वारी" आपली कलाकृती अर्पण करीत असताना मृत्यू यावा हे किती विलक्षण! कलेच्या साधनेत स्वतःचे समर्पण करणे फार थोड्यांच्या वाट्याला येत असावे.

**—ना. व्यं. देशपांडे,** वांद्रा

●

भोब्यांचा व माझा परिचय गेल्या काही वर्षांतला. दीपावली कचेरीत तो अधिकच दृढावला. त्यांच्यातील गुण अवगुणाबद्दल तुम्ही कितीकदा माझ्याकडे बोलला होता. भोब्यांच्या दुःखद बातमीने आज मला माझेच समाधान करता येत नाही. काय झाले हे? असा संगीतादी कलातील रसिक कुठे इतक्या चटकन् नाहीसा झाला? काय ही देवाची इच्छा? असे का व्हावे? की अत्यंत तरल भावनावश असलेला हा भोबे ह्या जगातील खोट्या गोष्टींना कंटाळला असेल म्हणून परमेश्वराने आपलासा केला. मी ह्या मिनिटाला तरी विलक्षण गोंधळून गेलो आहे. कुणी नातेवाईक गेल्यागत डोळ्यात सारखे पाणी येते. देवाने त्याला सुखी ठेवावे. त्याच्याजवळच तो सुखी रहावा.

**—सुरेश गजेंद्रगडकर,** अमदावाद

भोबे यांच्या अकाली निधनाची बातमी वाचून धक्काच बसला. सर्वानाच आश्चर्य वाटले. आता त्यामुळे 'सारेच' विस्कळीत झाल्यासारखे वाटते आहे.

**—चित्रकार द. ग. गोडसे,** बडोदे

●

भोबेकाकांच्या निधनाची बातमी समजली नि मनाला चटका बसला. एखाद्या ध्यासाने वेडी होणारी त्यांच्या सारखी माणसं आता विरळ होत चालली आहेत. एका स्वरवेड्या, कलावेड्या, सरळ, सुस्वभावी माणसाला आपण फार लौकर पारखे झालो. काही माणसं अशी असतात की त्यांचा आपला फारसा संबंध अगर परिचय नसला तरी त्यांच्याबद्दल स्नेहभावना मनात वावरत असते. भोबेकाका असेच एक होते. या स्वरवेड्या माणसाला स्वरांच्या नि तालांच्या धुंदीत असतानाच मृत्यूने उचलून न्यावे हा एक विलक्षण औचित्यपूर्ण योगायोग आहे.

**—प्रा. मदन नाडकर्णी,** जळगाव

●

काय अचानक भोबे गेले! तुमचा तर जणू उजवा हातच गेला की! त्यांच्यावर लिहिण्याविषयी मी तुम्हांला बोलल्याचे स्मरते. पण आळसामुळे मी त्यांना भेटू शकलो नाही. त्याविषयी आता फार हळहळ वाटते. सत्कार्यासाठी आळस करून उपयोगी नाही हेच खरं.

**—अरविंद ताटके,** ठाणे

●

श्री. भोबे गेले! विश्वासच बसला नाही. अतिशय वाईट वाटले. काय हे!

**—वा. रा. सोनार,** अमळनेर

●

गोपाळकृष्ण भोबे गेले! तडका फडकी निघून गेले. आणि मृत्यूही किती हेवा करण्यासारखा? दुसऱ्या कशासाठी भोब्यांचा हेवा कोणी केला नसेल तर यासाठी तरी करावाच करावा!

नितांत भक्ती असलेल्या जांबावलीच्या त्यांच्या दामोदराच्या चरणापाशी पहाटेच्या वेळी भजनात दंग झालेले असता मृत्यू म्हणजे किती सुंदर मृत्यू! देवा! मला असलाच मृत्यू द्या! असेच प्रत्येक जण मागणे मागेल. मृत्यूच्या पाशातून आपण कुणीच चुकणार नाही. ही एकच गोष्ट अशी आहे की रंकापासून राजापर्यंत कोणालाच चुकवता येत नाही. मग असा मृत्यू येणे यापेक्षा जास्त भाग्य कोणते? कोणाच्याही मृत्यूने मी कित्येक वर्षांत हळहळलो नाही इतका गोपाळकृष्ण भोब्यांच्या मृत्यूने हळहळलो आहे. एक भोळा भाबडा सच्चा कलावंत निघून गेला. तडकाफडकी. मित्रास व शत्रूस हळहळत ठेवून, भजन रंगात रंगला असता कुलदैवताच्या पायाशीच पंचत्वात विलीन झाला. खरोखरच भोबे पुण्यवान! व त्यांची दामोदराच्या चरणावरची निष्ठाही खरी खरी निष्ठा.

**—बाबुराव कामत,** वसई

●

भोबे यांच्या निधनवार्तेने अक्षरशः सुन्न झालो. आपल्या सर्वांच्या दुःखात मी सहभागी आहे. (तार)

**—रणजित देसाई,** कोल्हापूर

कै. भोबे यांच्या कलाजीवनाचा शेवट इतक्या लौकर व्हावा याची हळहळ वाटते.

**—सरचिटणीस, विदर्भ साहित्य संघ**

●

"........?" गोपाळकृष्ण भोबे यांची बातमी खरी का? आपल्या कार्यालयात त्यांचा परिचय झाला होता. अजूनही डोळ्यापुढे त्यांचे ते भव्य व्यक्तित्व उभे राहत आहे. एक अत्यंत उत्कृष्ट कथालेखक, मर्मज्ञ टीकाकार, नभोवाणीचा नट, संगीतज्ञ व कथाचित्रकार अशा विविध अंगांनी परिपूर्ण असा कलावंत ४६ व्या वर्षी जावा! परमेश्वराची लीला और आहे खरे. आयुष्यरेषा ही खरी तुटली की संपले. त्यांच्या मृत्यूने दीपावलीचे नुकसान तर झाले आहेच पण मराठी सारस्वतांचेही मोठे नुकसान झाले आहे.

**—चित्रकार र. वा. केळकर,** अहमदनगर

●●●










# धन्य ते गायनी कळा

( अंक दुसरा : प्रवेश तिसरा )

(स्थळ– वृंदावन. गुसाई विठ्ठलनाथांचा मठ. समय सायंकाळचा. मध्यभागी उच्चासनावर वृद्ध गुसाई विठ्ठलनाथ बसले आहेत. सभोवार काही संगीतकार आणि शास्त्रकार आसनस्थ झाले आहेत. त्यांच्या समोरच एका आसनावर साथीदारांसह तानसेन राग मुलतानी गात आहे गाणे ऐन भरात आले आहे. तानसेन आलापी, हरकती आणि तानांचे पलटे ह्यांची शर्थ करीत आहे, पण समोर बसलेले संगीतकार आणि शास्त्रकार त्याला दाद देत नाहीत की त्यांच्या पुतळ्यासारख्या निर्विकार मुद्रेवर कसलाही भाव उमटत नाही. क्षणाक्षणाला तानसेन नाराज होतो, त्याचा तेजोभंग होतो. अखेर कसेबसे गाणे संपवून तानसेन तंबोरा खाली ठेवतो. क्षणभर बोचक शांतता. नंतर–)

विठ्ठलनाथ:– पंडीत हो, प्रख्यात दरबार गवई तानसेनजी मुद्दाम वाकडी वाट करून वृंदावनला आले, आणि त्यांनी आपल्या मठाला भेट दिली. रीतीप्रमाणे आपण त्यांचं अतिथ्य आणि त्यांच्या इतमामाला शोभेसा पाहुणचार तर केला पाहिजे.

(सगळे शास्त्रकार माना डोलावतात. )

शिष्यवर, तानसेनजींच्यासाठी नजराणा तर घेऊन याल.

शिष्यवर (उठत):– गुसाईजी, नजराण्याची सिद्धता आहे, आज्ञा होईल तो—

तानसेन:– थांबा, विठ्ठलनाथ गुसाईजी, आपण जाणता शहेनशहा अकबर बादशहांनी मला संगीतसम्राट ही पदवी देऊन शाही दरबारच्या नवरत्नांत माझी स्थापना केली आहे.

विठ्ठलनाथ:– होय, आमच्या कानी आली आहे ती वार्ता. म्हणून तर आपल्या इतमामाला साजेसा नजराणा अर्पण करून आम्ही आपला सत्कार करणार आहोत.

तानसेन:– गुसाईजी, वृंदावनच्या या मठाकडून नुसत्या सत्काराची मला अपेक्षा नाही. इथे जमलेल्या संगीतकारांनी, शास्त्रकारांनी आज माझ्या गाण्याचं मोल करावं, अशी आस धरून मी इथं आलो आहे.

विठ्ठलनाथ:– तानसेनजी, तसा आग्रह तुम्ही धरू नये.

तानसेन:– विठ्ठलनाथ गुसाईंच्या मठात तानसेनच्या गायनाचं मोल होणार नसेल, तर इथं येण्यातले माझे श्रम व्यर्थच गेले असं म्हणावं लागेल. गुसाईजी, आपला कौल मला हवा आहे.

विठ्ठलनाथ:– पुन्हा एकदा विनंती करतो की, तसा आग्रह धरू

'धन्य ते गायनी गळा' यासाठीच कमळाभंवती रुंजी घालणारे भ्रमर होते आमचे भोबे. इतका कदरदाँ आपल्या दरबारी असावा असेच कैलासपतीला वाटले असावे. म्हणूनच त्याने भोबे यांना गंधर्व, यक्ष आणि किन्नरांसमवेत नेऊन बसविले असावे.

संगीत सम्राट तानसेन यांच्या जीवनावर गोपाळकृष्ण भोबे यांनी नाट्य रचले. आणि ते संगीतप्रेमी, कलाप्रेमी शंकराला दाखविण्यासाठीच जणू काय भोबे त्यांचे दरबारी हजर झाले.

'धन्य ते गायनी कळा' या त्या नाटकाची ही छोटीशी झलक आहे. संगीत-विशेषांकाचे निमित्ताने.....

गोपाळकृष्ण भोबे



अनुक्रमणिका

नका. आम्ही दिलेला कौल कदाचित तुम्हांला रुचणार नाही.

तानसेन:— आपण कौल देणार नसाल, तर सत्काराचा नजराणाही मला स्वीकारता येणार नाही.

विठ्ठलनाथ:— ठीक, ठीक. जशी तुमची मर्जी! शिष्यवर, सत्काराचा नजराणा आणि वृंदावनच्या शास्त्रकार, संगीतकारांनी तानसेनजींच्या गाण्याचं केलेलं मोल, दोन्हीही पेश करा.

शिष्यवर:— जशी आज्ञा. (आत जातो.)

तानसेन:— गुसाईजी, आपण जाणता, मी नायक पांडवीयांचा पुत्र.

विठ्ठलनाथ:— ते तर आम्ही उत्तम रीतीनं जाणतो. आपल्या पिताजींच्या गाण्यात गायकीच्या चारी प्रकारांचा सुरेख संगम झाला होता. त्यांचे गाणे जसे धीरोदान्त तसेच धीरोदत्त, जितके धीरप्रशांत तितकेच धीरललित होते. शिवाय वृत्तीनं ते साधुपुरुषही होते. म्हणून तर त्यांना नायकपद प्राप्त झाले.

तानसेन:— ह्या कसोटीला माझी कला उतरत नाही, असं का आपल्याला म्हणायचंय? (विठ्ठलनाथ मंद स्मित करतात तशी—) स्पष्ट स्पष्ट बोला, विठ्ठलनाथजी, तुमच्या बोलण्याचा मला राग नाही.

[तोच शिष्यवर मुद्रांनी भरलेले एक चांदीचे ताट (वर रेशमी आवरण) घेऊन येतो. गुसाईजी ताटाला स्पर्श करतात. शिष्यवर ते ताट तानसेनसमोर ठेवतात. तानसेन हलक्या हातांनी रेशमी आवरण दूर करतो. तो आत मुद्रांचा ढीग आणि त्यावर एक भली मोठी कवडी ठेवलेली दिसते.]

तानसेन:— गुसाईजी, ह्या, ह्या नजराण्याचा अर्थ काय?

विठ्ठलनाथ:— तानसेन, त्या कवडीखाली ज्या मुद्रा आहेत, त्या तुमच्या दरबारी इतमामाच्या सन्मानार्थ. दरबारी कलावंतांचे प्रतिनिधी म्हणून तुम्ही या वृंदावनच्या मठात आलात. त्यासाठी हा अहेर.

तानसेन (प्रक्षोभानं):—आणि ही कवडी?

विठ्ठलनाथ:— वृंदावनातल्या शास्त्रकारांनी केलेलं तुमच्या गाण्याचं मोल.

तानसेन (संतापानं):— ह्याचा अर्थ (कवडी उचलीत) माझी कला कवडी मोलाची आहे?

विठ्ठलनाथ:— तुम्ही आपल्या हट्टानं आम्हांला हा कौल द्यावयाला लावलात. तानसेनजी, आम्ही नायकाचा सन्मान करतो—गायकाचा नव्हे.

तानसेन:— गुसाईजी, गायक हे देखील कलावंतच असतात ना?

विठ्ठलनाथ:— बादशहाच्या तालावर नाचणारे तुम्ही चमत्कार करणारे कलावंत, एकाद्या जादुगाराहूनही आम्ही तुम्हांला अधिक किंमत देत नाही. आमच्या लेखी तुमच्या कलेची किंमत ह्या कवडी इतकी. तानसेनजी, कवडी दूर ठेवा आणि नजराण्याचा स्वीकार करा.

तानसेन (रागाने थरथरत):— विठ्ठलनाथजी, वृंदावनानं दिलेला हा कौल तेवढा मी स्वीकारणार आहे. आणि तुम्हा मत्सरी, क्षुद्रबुद्धी नायकांच्या ह्या नजराण्याची संभावना मी ही अशी करणार आहे.

(असे म्हणत लाथेनं तबक ठोकरतो. सर्वत्र मुद्रा उधळतात. 'हे काय, हे काय' म्हणत शास्त्रकार, संगीतकार आणि विठ्ठलनाथजी उठून उभे राहतात, तोच—)

तानसेन:— आता वृंदावनच्या नायकपदाची मला तमा नाही. मला हवं असलेलं पद भारतीय रसिकांकडूनच मी मिळवीन. (आवेशानं तराणा म्हणत निघून जातो. सगळे चकीत होऊन पहात असतानाच—) (पडदा पडतो.)

● ● ●











अनुक्रमणिका

# प हि ली पा उ ले

यशाचे शिखर गाठल्यानंतर पहिल्या पायरीकडे वळून पाहण्यात मोठी गंमत असते, नाही ? कलेच्या, जीवनाच्या सर्वच क्षेत्रांतली ही "पहिली पावले" काही आगळीच आनंद देवून जातात. (केवळ पुनःप्रत्ययाचाच तो आनंद असतो का ? ठरवा तुम्हीच.) 'दीपावली'च्या संगीत अंकाचे निमित्त करून महाराष्ट्रात व बाहेरही ख्यातकीर्त झालेल्या गायिकांना आम्ही आवाहन केले. म्हणालो, "सांगा की ती गंमत जंमत ! !"

आमच्या आवाहनाला मान देऊन सुविख्यात गायिका सौ. माणिक वर्मा, प्रभा अत्रे, सौ. सुहासिनी मुळगांवकर, शोभा गुर्टू व लक्ष्मी शंकर यांनी ती 'पहिली पावले' पुढील स्तंभातून शब्दांकित केली आहेत.

त्यांच्या पहिल्या वहिल्या (असूनही) मैफली रंगल्या. मैफलींच्या ह्या स्मृती–तशाच रसील्या रंगतदार ! !
तंबोरे मस्त जुळले आहेत. षड्ज लावायला सांगू या ! !

—संपादक

## 'ओंकार'ने दिधला "आशिष" !!

—माणिक वर्मा

१९४५ साल असेल ते. मी कॉलेजात शिकत होते तेव्हा. बी. ए. चं शेवटचं वर्ष होतं माझं ! माझी संगीत साधनाही चालूच होती. सुरेशबाबूंकडे मी शिकत होते. दिवसातून निदान चार पाच तासं मेहनत करण्याबद्दल माझ्या आईचाही कटाक्ष होता. मीसुद्धा अभ्यास आणि गाणं याखेरीज दुसरं कसलंही व्यवधान मागे लावून घेतलं नव्हतं. अशावेळी एक दिवस पंडित ओंकारनाथ ठाकूर स्वत: माझ्या घरी आले. आणि बडोदा येथे भरणाऱ्या संगीत परिषदेमध्ये गाण्याचं त्यांनी मला आमंत्रण दिलं. पं. विनायकबुवांनी त्यांना माझ्या गाण्याबद्दल सांगितलं होतं. आणि म्हणून ते मुद्दाम आले होते. मला तो आनंदाचा आणि आश्चर्याचा एक धक्काच होता. एवढा मोठा भारतीय कीर्तीचा पट्टीचा गायक माझ्याकडे गाण्याचं निमंत्रण घेऊन येतो यातच मला माझ्या कलेचं सार्थक वाटलं होतं. मी मोठ्या हर्षाने त्या आमंत्रणाचा स्वीकार केला आणि त्या दृष्टीने तयारीला लागले. कॉन्फरन्सला अजून महिनाभराचा अवकाश होता. त्या वेळेचा मी पुरेपूर उपयोग करून घ्यायचं ठरवलं नि मेहनतीला लागले. माझ्या आईवडिलांनी त्यासाठी सर्व परीनी मदत केली. तंबोऱ्याची सुरेल अशी नवी जोडी घेऊन दिली. आणि महिनाभर तयारी करून मी कलकत्त्याला निघाले. माझं पहिलं वहिलं गाणं म्हणून आई-वडिल, भाऊ सर्वचजण माझ्याबरोबर आले होते. कॉन्फरन्सचा दिवस उजाडला. आम्ही बरेच लवकर हॉलवर गेलो. समारंभाच्या चालकांनी मला मी काय गाणार ते विचारून घेतलं. मी पूरिया गाणार होते तशी तयारी केली होती. ते मी त्यांना सांगितलं. माझ्याकडे एकवार नीट पाहिल्यावर मान हलवीत ते म्हणाले, "नको, नको नव्यानं गाताहात तुम्ही. इथे बरीच बडी माणसं गाणार आहेत. तुम्ही

आपला शंकरा किंवा असाच एखादा सोपासा राग निवडा." मी थोडीशी खट्टू झाले पण कबूल केलं. थोड्या वेळानं पंडितजी आले. मी पाया पडून त्यांचा आशीर्वाद घेतला. त्यांनी मला धीर देऊन विचारलं, "काय गाणार आहेस?"

मी म्हटलं, "पूरिया गाणार होते पण हे लोक सांगताहेत शंकरा गायला."

"त्यांचं नको मनावर घेऊस. तुला जे काय गायचं असेल तेच गा. मात्र मनापासून गा म्हणजे झालं. जा यशस्वी हो." मी नवी म्हणून मला सुरुवातीला गायला सांगितलं होतं. हॉल पुरेसा भरला नव्हता. मी गायला बसले. तंबोरे लावून घेतले. समोर बसलेला एवढा समुदाय पाहिल्यावर छातीत धडधडलं. पण देवाचं नाव घेऊन स्वर लावला. आणि मग मी गाण्यात खरोखरच रंगून गेले. अर्धा तास—थोडा अधिकच वेळ मी पूरिया गायले आणि टाळ्यांच्या गजरात तो संपवला. त्या गजरापेक्षाही माझ्या गाण्याने माझं समाधान झालं होतं. त्यानंतर मध्यंतर संपल्यावर मला मुद्दाम पुन्हा गायला सांगितलं आणि मी ठुमरी म्हटली. गाणं संपल्यावर जमलेल्यातील दर्दी मंडळींनी—अगदी समारंभाच्या चालकांनीसुद्धा माझी प्रशंसा केली. पण मला धन्य धन्य वाटलं ते पंडितजींच्या शब्दांनीच. मला शाबासकी देऊन ते म्हणाले, "फार छान गायलीस बिटिया, मला वाटलं होतं त्याहीपेक्षा बरीच तयार आहेस तू. विनायकबुवांनी माझ्याजवळ तुझं कौतुक करताना जे सांगितलं होतं त्यात मुळीच अतिशयोक्ती नव्हती. अशीच तयारी ठेव. तुझा सूर सच्चा आहे."

मला आजही समाधान आहे पंडितजींच्या त्या प्रशस्तीचं. त्यानंतर माझे अनेक कार्यक्रम झाले. त्यातले कित्येक—खरं सांगायचं तर बहुतेक गाजले. पण आजही ती पहिली बैठक कालच झाल्यासारखी वाटत राहिली आहे.

गेली २२–२५ वर्षं मी गाते आहे. माझ्या गाण्यातील यशात मेहनतीच्या बरोबरीनं दैवाचाही वाटा आहे असं मला वाटतं. कारण संगीत हा व्यवसाय बनविण्यासाठी आवश्यक असणारी सर्व अनुकूलता मला नशिबानंच लाभत गेली आहे. संगीतप्रेमी आणि जाणकार नातेवाईक, गुरू यांच्यासारखंच माझ्या गाण्याच्या चाहत्यांनीही माझं गाणं घडवलं आहे. सुरुवातीच्या माझ्या गाण्यातील स्वर किंचित नाकात लावण्याची पद्धत (जी किराणा घराण्याच्या गायकीत नेहमीच आढळून येते) काढून टाकायला किंवा ठुंबरी गाताना शब्दोच्चारात अधिक अर्थपूर्णता आणायला मला त्यांनीच भाग पाडलं आहे. बनारसला काही वर्षं राहिल्यामुळे माझी ठुंबरी अधिक कलात्मक घडायला मदत झाली. त्याबरोबरच सतत मेहनत करून मी माझं गाणं वाढवण्याचा आणि त्याचा कस टिकवण्याचा प्रयत्न केला आहे. सुरेशबाबू मान्यांसारखा गुरू सुरुवातीलाच मिळाल्यामुळे त्यांनी माझ्या आवाजाची जात आणि आवाका ओळखून कसं गावं हे मला शिकवलं आहे. सहासहा महिने एकच सूर घटवून सुरांचं महत्त्व पटवलं आहे. तेव्हा माझ्या गाण्यातली प्रसन्नता, सुरेलपणा ही देणगी त्यांची आहे. त्यानंतर अनेकांचं अनेक प्रकारचं गाणं ऐकून आणि शक्य तितक्या सातत्यानं रियाज करून मी माझ्या गायकीत विविधता आणि रंजकता आणण्याचा प्रयत्न केला आहे. आज माझं गाणं हे केवळ सुरेशबाबूंचंच गाणं आहे असं मला वाटत नाही. गाणं दुसऱ्याकडून शिकावं पण गाताना स्वतःचं गावं ही माझ्या आईनं मला शिकवण दिली आहे. ती शक्य तेवढी प्रत्यक्षात आणण्याचा मी प्रयत्न केला आहे. आणि पुढेही माझी मुलगी भारती, सरला भिडे यांच्यासारख्या शिष्या तयार करताना माझं गाणं त्यांना शिकवलं तरी अखेर तेच ध्येयवाक्य डोळ्यापुढे ठेवण्याचा आदेश मी त्यांना देते. ●

# वेल मांडवावर गेला!

—प्रभा अत्रे



**श्रावणाच्या** पहिल्या सुगंधी सरी पडाव्यात. जीवाची ओंजळ करून आपण सहज हाताशी आलेला गोकर्णीचा साधा वेल दारात लावावा. त्याला पावसाचं पाणी मिळावं. आपणही त्या रोपाला पाणी दाखवावं. मग हळूहळू वेल वाढत जावा आणि चारचौघांच्या कौतुकाचे किरण झेलत, फुलांनी डंवरलेला तो देवाघरच्या आशीर्वादासारखा छाया करणारा वेल मांडवावर जावा, एका इवलाल्या रोपाचं रूपांतर बहरलेल्या हिरव्यागार लतामंडपात व्हावं—माझ्या गायनाचं हे माझ्यापुरतं तरी असं झालं आहे.

शिक्षकाची मुलगी मी. वडिलांनी विद्यार्थ्यांच्यामध्ये संस्कार पेरले. देवाच्या घरी त्या विद्यादानाचा हिशोब 'पुण्य पेरले' असा मांडला गेला. आबांचा तो पुण्य-






संचय मला पावला. भरपूर द्रव्य पदरात न बांधण्याची दक्षता घेतलेल्या देवाने अनुग्रह म्हणून माझ्या गळचात एक गोड सूर ठेवला आणि चित्तात प्रसन्नतेचा दिवा लावला. पण मी गायिका होईन असं मला कधी वाटलं नव्हतं. माझ्या आईच्या आजारपणात आई विरंगुळचासाठी पेटी-वादन शिकली. तिच्या ओढीनें मी गाणी गाऊ लागले. सुरुवातीला विजय करंदीकरांनी मला गायन कलेतले पहिले धडे दिले. मी रियाज केला. आबांचे स्नेही वैद्यराज देशपांडे म्हणून होते. माझं गाणं ऐकून त्यांनी केवळ मान डोलवण्या-वरच भागवलं नाही, तर त्यांनी आबांना गळ घातली, "ह्या तुमच्या लेकीला चांगलं गाणं शिकवा! अधिक गाणं शिकवा." "ठीक! पण हिला शिकवणार कोण?" वैद्यराजांनीं सुरेशबाबूंचं नाव पुढे केलं. मास्तरांना योग अशक्य कोटी-तला वाटला. वैद्यराजांना आपलं वजन खर्च करण्याची प्रेरणा देवाने दिली. एक दोन रागांची चांचणी घेऊन सूरसम्राट सुरेशबाबू माने ह्यांनी एका गरीब मास्त-रांच्या सुमार मुलीला कष्टसाध्य विद्येवर हात ठेवायला सांगितला. बिदागीच्या बाबतीत वाद न घालण्यात सुरेशबाबूंच्या मनाचं मोठेपण दिसून आलं. आमचा दोघांचा गुरु-शिष्य म्हणून संबंध आण-ण्यात, माझ्यापुरतं तरी, देवाचं देवपण दिसून आलं. प्रारब्धात असेल, तर देव केवढी कृपा करून जातो !

माझ्या गायन शिक्षणाचा श्रीकार सुरेशबाबूंच्या सावलीत घातला गेला. वर्षभर 'यमन' हा नमनाचा एकच राग त्यांनी माझ्याकडून सक्त घोटवून घेतला. शिष्य कंटाळला. गुरूंनी टंगळमंगळ चालू दिली नाही. सुरेशबाबू रोजच्या रोज तालीम देत राहिले. त्यांचं गाणं ऐकताना सोपं वाटायचं. त्यांच्यासारखं गायला बसलं की मात्र शरणचिठी लिहून देणं भाग पडायचं. हे थोडसं तुकारामाच्या अभंगा-सारखं होतं. वाचताना अभंग कमालीचा सोपा वाटतो. पण जन्मभर घोकूकाम करूनही तशा दोन ओळी लिहिणं साधत नाही! सुरेशबाबूंच्या मागे मी 'सा' लावू लागले. वृक्षाच्या सावलीत फुलझाड खुरटतं हे त्यांना माहीत होतं. मी वेगळं, स्वतंत्र असं गावं अशी त्यांची दृष्टी होती. त्यांचे जलसे होत. मी बरोबर असे. मिरजेला खाँसाहेब अबदुल करीमखांच्या पुण्यति-थीच्या जलशात मी गायले. सुरेशबाबूंना संतोष झाला. माझ्या अंगावर मूठभर मांस चढलं. उमेद अंकुरली. आता गुरु-कृपेच्या वळावर जलसा मारून नेईन असं वाटलं. देवाच्या अनुग्रहाची वाट पाहू लागले. आणि—

आस भास नसताना त्रेपन्नसाली सुरेश-बाबूंना देवाज्ञा झाली! माझ्यावर आकाश कोसळलं; धरणी दुभंगली.

गुरू नसलेल्या जगात माझी पहिली मैफल झाली. कशी झाली? परमेश्वर जाणे!

बरी झाली असावी असं वाटतं. उमा-ळचाने दिलेला गुरूचा आशीर्वाद फुकट कसा जाईल ?

गुरूचा आशीर्वाद आणि देवाचा अनु-ग्रह ही माझी अमोघ, अकलंकित आणि अपराजित श्रद्धास्थानं आहेत. त्यांचा आधार मला आजवर पुरला. देवदत्त सुराची आराधना सतत चालू आहे. आईबाबांची सावली हा जीवीचा दिलासा आहे. हिराबाईंची कृपादृष्टीही माझ्यावर आहे; रसिकांचीही असावी असे मागणे आहे.

●

## वसंत देशमुखांच्या दोन कादंबऱ्यांचे आचार्य अत्रे ह्यांच्या हस्ते प्रकाशन



'इथेचि जन्मली वेदना' आणि 'अद्भुता' ह्या वसंत देश-मुखांच्या दोन कादंबऱ्यांचे प्रकाशन आचार्य अत्रे ह्यांच्या हस्ते २० एप्रिलला मोठ्या थाटात झाले. 'अद्भुता' ह्या अद्भूत-कादंबरीची पहिली प्रत आचार्य अत्रे ह्यांना मोठ्या नाटयपूर्ण रीतीनं सादर करण्यात आली. शुभ्रवेषधारी भारती रावकवीनीं अद्भूत स्त्री वाटावी असा परिवेष करून मंद प्रकाशात आचार्य अत्रे ह्यांना प्रत अर्पण केली. श्री. बाळ सामंत ह्यांनी देशमुखांची वैशिष्ठ्ये सांगून त्यांना जरा धीमे-पणानं साहित्य–निर्मिती करण्याचा उपदेश केला. लोककवि मनमोहन नातू ह्यांनी श्री. वसंत देशमुखांना त्यांच्या सर्व मोठेपणाचे श्रेय दिले. ते म्हणाले, "जेव्हा मला एखाद्या गटारा-तल्या जंतूएवढी महाराष्ट्रात किंमत नव्हती तेव्हा श्री. देश-मुखांनी मला अपार प्रोत्साहन दिले."

श्री. वसंत देशमुखांनी समयोचित भाषण केले. साहित्य निर्मितीचा वेग नि त्याचा दर्जा ह्यांचा तसा फारसा संबंध नाही, असं त्यांनी प्रतिपादिले.

आचार्य अत्रे म्हणाले, श्री. वसंत देशमुखांकडून महा-राष्ट्राच्या काय अपेक्षा आहेत. कादंबरी, नाटय, काव्य ह्या विविध दालनांत त्यांनी साहित्यिक कामगिरी बजावलेली आहे. तुमची प्रतिभा फुलली आहे तोंवर सारखे लिहीत रहा असा त्यांनी देशमुखांना उपदेश केला.

ह्या समारंभास ज्ञानेश्वर नाडकर्णी, रमेश मंत्री, ललिता बापट, वंदना विटणकर, वसंतकुमार सराफ इ. मंडळी उपस्थित होती.





# स्वप्नाचे रंग ओले आहेत



सौ. सुहासिनी मुळगांवकर

**पहिल्या** पाऊसपाण्याचे तुषार अंगणात वरसावेत, त्याप्रमाणे संगीताचे सूर माझ्या माहेरच्या घरात खेळत असत. माझं माहेर देशपांडयांकडचं. अगदी जुन्यात जुन्या अशा माझ्या ज्या आठवणी आहेत, त्यात घरातल्या संगीताच्या उपासनेच्याही स्मृती आहेत. कोल्हापूरचे श्री. शंकरराव देशपांडे माझे वडील. पं. अवदुल करीमखांच्यांकडे त्यांनी किराना घराण्याच्या गायकीची तालीम मोठ्या तलफेने घेतली होती. देवघर मास्तर, वामनराव देशपांडे, नारायणराव व्यास, वामनराव सडोलीकर ही मंडळी त्यांच्या बैठकीत असत. त्यामुळे गाणं कानावर असेच. नाटकातली पदं, कीर्तनातले अभंग, गौळणी, मी अनुकरणाने घोळवू लागले. अगोदर गाण्यांचा आणि पदांचा परिचय विनासायास झाला. माझ्या वडिलांनी नंतर मग मला शास्त्रोक्त गायनातला श्रीगणेशा शिकवला. झालं हे बरं झालं, कारण गाण्यावरून रागाच्या थाटाची कल्पना येणं, त्याची सुरावट मांडता येणं, सोपं जातं. "नाथ हा माझा" हे पद अगोदर येत असलं तर यमन रागाचं स्वरूप कळणं सुलभ आणि सोईस्कर होतं. तेव्हा, हा क्रम माझ्या पथ्यावर पडला. शास्त्रोक्त गायनाचे प्राथमिक धडे वडिलांच्या पायापाशी बसून घेतल्यावर नंतर वामनराव सडोलीकरांनी मला जयपूर घराण्यातल्या भारदस्त पद्धतीची तालीम दिली. पं. भुर्जिखाँसाहेबांजवळ ते ती गायकी शिकलेले होते. तिचे पहिलेवहिले संस्कार माझ्या गळयावर झाले. सुरांची थोडीशी जाण आल्यावर नंतर घराणेदार गायकीशी शिष्याच्या पायरीवरून परिचय झाला हे पण योग्य झालं. वामनरावांची शागिर्दी मी बहुत काळ केली. नंतर सारंगिये उस्ताद मस्जीतखाँ ह्यांची गाण्याची तालीम मला मिळाली. माझे वडील, वामनराव आणि उस्तादजी ह्यांनी माझ्याकडून गानविद्येतले प्राथमिक धडे उत्साहाने घोटवून घेतले. त्यामुळे माझी काही एक किमान तयारी झाली. पोहोण्याची विद्या मी शिकले. घराणेदार गायकीचा अथांग सागर माझ्यासमोर फेसाळत होता.

काळाचे आव्हान मला स्पष्ट ऐकू येत होतं. एकीकडे व्याकरणशुद्ध घराणेदार शास्त्रोक्त गायकीचं भारदस्त क्षेत्र होतं. दुसरीकडे मराठी नाटयसंगीताचं दिमाखदार दालन होतं आणि तिसरीकडे माझ्या वैवाहिक संसाराची हिरवळही मनाला भुरळ घालीत होती. एकाच वेळी ह्या तिन्ही क्षेत्रांत उज्ज्वल यश मिळवणं महाकठीणकर्म होतं. व्यक्तिगत संसार सुखा-सावलीचा करणं हे तर माझं पहिलं कर्तव्य होतं आणि संचिताच्या बळावर मी ते साध्यही केलं. उरलं, शास्त्रीय संगीत आणि नाटयसंगीत. मनाचा निश्चय होण्याच्या सुमारालाच मला भारत सरकारची खानदानी संगीताची दोन वर्षांची शिष्यवृत्ती मिळाली आणि तिचा सस्मित स्वीकार करून मी मोघूबाई कुर्डीकरांकडे जयपूर घराण्याच्या गायकीचा रियाज करू लागले. मात्र काही घरगुती अडचणीमुळे मला शिष्यवृत्तीचा फायदा फक्त एकच वर्ष घेता आला. त्यानंतर मी एकपात्री नाटयप्रयोगाच्या अजिबात नवीन अशा क्षेत्रात पदार्पण केल. माझा पहिला खासगी स्वरूपाचा एकपात्री नाटयप्रयोग दिल्लीला १९६० साली झाला. त्याचा गाजावाजा झाला नाही. मात्र मला एक नवे कलाक्षेत्र लाभल्याचा दिलासा मिळाला. तेव्हापासून आतापर्यंत ओळीने आठ वर्षे मी एकपात्री संगीत नाटयप्रयोग रसिकांच्या पुढे सातत्याने सादर करीत आले आहे. हीच माझी कलासाधना, की जिच्या सिद्धीत माझे कलावान यजमान श्री. मुळगांवकर ह्यांनी उमाळयाची अविचल साथ दिली.

ह्या दरम्यानच्या आठ वर्षांत मी कै. बालगंधर्व, हिराबाई बडोदेकर, ठुमरी गायकीचे आचार्य त्रिवेदी, किशोरी आमोणकर, कमल तांबे वगैरे गुरुजनांपाशी मनोभावे शिकले. अजून शिकेन अशी उमेद आहे. पण काळ बदलतो आहे ह्याचेही मला भान आहे. दिलेल्या औटक्या वेळात गायनातला रसोत्कर्ष साधून रसिकांच्या पसंतीची टाळी मिळवू शकणाऱ्या कलावंतांचाच ह्या पुढचा काळ आहे. त्या परीक्षेला मी उतरेन काय, हाच खरा प्रश्न आहे. एकपात्री नाटयप्रयोगांमुळे माझं नाव चारी दिशांना झालं, पण त्यामुळे घराणेदार संगीताच्या एकटक उपासनेचं माझं स्वप्न खूप मागे पडलं आहे; आणि त्याची रुखरुखही मनाला आहेच.

ही स्थिती आजची आहे. एका तपापूर्वी असं नव्हतं. उस्ताद मस्जीतखाँची खासी घरंदाज तालीम मला मिळत होती. नंद राग मला त्यांनीच शिकवला. न्यायमूर्ती बी. एन. गोखले ह्यांच्या घरी मोजक्या रसिकांसमोर माझी पहिली बैठक गणपतीच्या निमित्ताने ५६ साली झाली होती. अनंतराव शिरगांवकर, कै. गोपाळकृष्ण भोबे समोर होते. मी वाद्यांना वंदन करून यमन रागाच्या आलापींना सुरुवात केली. नंद गायले. पदं गायले. रसिकांची दाद मिळत होती. आणि त्यामुळे उत्तेजित झालेल्या मनासमोर व्रतस्थ परंपरेचं महावस्त्र अंगाखांद्यावर झुलणाऱ्या शास्त्रोक्त गायकीतल्या दिग्विजयाचं एक भव्य स्वप्न माझ्या नजरेसमोर तरळत होतं.

अजूनही त्या मखमली स्वप्नातले गहिरे रंग विरलेले नाहीत!

●











शोभा गुर्टू

# 'सुरासुरातुनि रस गळतो'

**गाणं** तसं पाहिलं तर आमच्या पाचवीला पुजलेलं. मला कळायला लागल्यापासून मी गाणं शिकतेच आहे. हे सगळं अर्थातच शास्त्रीय गाणं. पण माझा कल मात्र वळला तो त्यातल्या थोड्याशा सुगम आणि शब्दप्रधान विभागाकडे–म्हणजे ठुमरी आणि तत्सम गाण्याकडे. त्याचं असं झालं–त्यावेळी श्रीमान् घम्मन खाँ माझ्या आईला ठुमरी शिकवायला येत. खाँसाहेब तालाला पक्के. ख्याल गायकीत ताल आणि सूर ते घटवून घेतच होते. पण ठुमरी शिकवताना तीत ते एवढी भावपूर्णता, एवढी रंजकता आणीत की मी कानात प्राण आणून त्यांची ठुमरी ऐकत राही. शिकवताना ते रोज नवा मुखडा दाखवीत. ठुमरीतील रसाविर्भावाप्रमाणे शब्दांचे उच्चार हळुवार, आर्त अगर वजनदारपणाने करीत. त्या ठुमरीनं मला आकर्षित करून घेतलं आणि तशा शब्दप्रधान गायनप्रकारावरचं माझं लक्ष केंद्रितही केलं. आईबरोबर किंवा तिच्या मागे बसून गाता गाता नंतर खाँसाहेबांकडून स्वतंत्र तालीम घेऊ लागले. गज़ल, ठुमरी, कजरी, दादरे, मांड गाणं हे हे माझं वैशिष्ट्य बनावं असं माझं ध्येय होतं आणि मला वाटतं ते मला पुरेसं साध्य झालं आहे. स्त्री गायिकात बेगम अख्तरचं वर्णन Queen of Thumari 'ठुमरी गायिकांची राणी' असं केलं जातं–मी तिचाच आदर्श माझ्यापुढे ठेवला होता. थोड्याशा आत्मगौरवानं पण समाधानानं मीही सांगू शकते की या अशा गायकीतील दर्दी आणि जाणकार अशा रसिकांनी विशेषतः अलाहाबाद, हैद्राबादवासीयांनी माझाही उल्लेख 'ज्यूनियर अख्तारी' या शब्दांनी केला आहे.

ठुमरी हा खरा उत्तरेकडील गायनप्रकार. तिला रागदारीच्या अंगानं फुलवलं, नटवलं तरी मुळात शब्दाला अतिशय महत्त्व. बहुधा करुण आणि शृंगार या दोन रसांचा आविष्कार ठुमरीतून केला जातो. तशी ठुमरी पूरब आणि पंजाब या दोन ढंगांनी गायली जाते. पैकी पंजाबी ढंग हा हरकती–मुरक्यांचा, हलका फुलका, लाडिक. तो शृंगारप्रधान काव्याला पोषक, तर पूरब ढंग गंभीर–करुण रसाला अधिक साजेसा. माझ्या गाण्यात हे दोन्ही ढंग–क्वचित बनारसी ढंगही आहे. तरीही या गाण्याला रसिकांनी दाद द्यायची तर त्यांनाही उर्दू भाषेचं ज्ञान हवं. मीर, गालिब, दाग, जौक, यांचे गज़ल किंवा पूर्वीतील ठुमऱ्या त्या त्या रसाचा परिपोष करणाऱ्या शब्दोच्चारांनी, शब्दात त्या भावना ओतून म्हणायच्या. तर गाणाऱ्याचं त्या भाषेवर प्रभुत्व हवं, तसं ऐकणाऱ्याचंही हवंच तरच गायक आणि श्रोत्यांचा सुसंवाद साधतो, गाणं खुलतं आणि श्रोत्यांकडून दाद मिळाल्यावर ते अधिक रंगत जातं. या गाण्यासाठी अदा मुद्दाम करावा लागत नाही. शब्द, सूर आणि ताल यांची चांगली जाण असेल तर गाण्यात तल्लीन होऊन श्रोतेदेखील गायकाबरोबर माफक प्रमाणात अदा करूनच दाद देतात हा माझा अनुभव आहे. त्या दृष्टीने हैद्राबाद इथं झालेली एक मैफल माझ्या चांगली स्मरणात आहे. हैद्राबाद म्युझिक कॉन्फरन्सला मला बोलावले होते. माझ्या वाटचाला वेळ फार थोडा दिलेला होता. शहरातील प्रतिष्ठित मंडळी गाण्याला आली होती. महाराष्ट्रीय गायकांच्या ठुमरीबद्दल–विशेषतः उर्दूच्या उच्चाराबद्दल निष्कारण गैरसमज मनात बाळगून असलेल्यांचा बराच भरणा त्यात होता. त्यामुळे माझ्या गाण्याविषयी फारशी उत्सुकता कुणाजवळ नव्हती. पण नशिबानं माझा आवाजही त्या दिवशी सुरुवातीपासून उत्तम लागला आणि गाणं रंगू लागलं, मी एक पंजाबी ठुमरी, गालिबची गजल व दादरा म्हटला. अगदी मनापासून, त्या त्या भावनात जीव ओतून. आणि हळूहळू मला दाद मिळू लागली. गाण्याशी एकरूप होऊन गायल्यामुळे अनाघाती मात्रेसाठी लयीच्या वजनाने हळूच दिलेली मानेची लचकही वाहवा घेऊन गेली. गाणं संपल्यावर तेथील चालकांनी आणि काही रसिकांनीही माझ्या सफाईदार उच्चारांची, भावपूर्ण गाण्याची आणि ठुमरीतील विविधतेची पुष्कळ तारीफ केली पण त्याहीपेक्षा कहर म्हणजे मी जन्माने महाराष्ट्रीय असण्याच्या अशक्यतेबद्दल दोघेजण रसिक पैजा मारून मोकळे झाले.

मैफली अनेक कारणांनी लक्षात रहातात. नुकतीच गेल्या वर्षी श्री. शिरोडकर यांच्या घरी मोजक्या श्रोत्यांपुढे आणि काही एक आधी कल्पना नसताना गायला लागूनही उत्तम रंगलेली बैठक माझ्या लक्षात राहील. त्या दिवशी गाणं चालू असताना अचानक माननीय श्री. गोविंदराव अग्नि ह्यांनी येऊन माझं गाणं ऐकले आणि समाधान व्यक्त करून शाबासकी दिली. असल्या मोजक्या क्षणांनी त्या त्या बैठकीचं मोल उजळून निघतं. याउलट सांगलीला





अनुक्रमणिका

झालेली एक बैठकही तिच्या विक्षिप्तपणामुळे माझ्या लक्षात राहिली आहे. त्या दिवशी मी ठरलेल्या वेळी गाण्यासाठी हॉलवर गेले. तिथं तेव्हा हाताच्या बोटावर मोजण्याइतकीच माणसं उपस्थित होती. आरामशीर जेऊन खाऊन माणसं जमेपर्यंत बैठक सुरू होण्यास बराच उशीर लागला. मी सुरुवातीचा एखादा राग जेमतेम आळवला असेल नसेल, श्रोत्यातून फर्माइशी यायला सुरुवात झाली. कुणी मला भावगीत म्हणायला सांगितलं, कुणी अभंग. ठुमरी कजरीत कुणालाच रस दिसेना. एकानं तर चक्क मला लावणी म्हणण्याचाच आग्रह केला. त्या लोकांची समजूत घालता घालता माझी पुरेवाट झाली. त्या दिवशी तबलजी आणि पेटीवाल्यानेच माझी बैठक निभावून नेली. कशीबशी मी चारदोन भजनं आणि भावगीतं म्हटली खरी पण त्यात माझं मन नव्हतं आणि श्रोत्यांनाही हवं ते मिळाल्याचं समाधान नव्हतं.

मी गाण्याचे बहुतेक प्रकार म्हणते. ठुमरी, गजल, दादरा हे माझं खरं क्षेत्र. त्याची सर्व अंगं मी प्रयत्नपूर्वक जोपासली आहेत. माझे गुरू श्री. घमानखाँ ह्यांच्या गायकीत तालाचा पक्केपणा आणि शब्दांचं वजन ह्याला असाधारण महत्त्व होतं. चीजेच्या मुखड्याचा वेगवेगळ्या प्रकारानं केलेला उठाव हे त्यांचं वैशिष्टच. त्यांचे हे विशेष माझ्या गाण्यात उतरले आहेत असं मला वाटतं. त्याखेरीज ठुमरीतील वेगवेगळ्या ढंगांचं मिश्रण आणि शब्दांची नेमकी फेक हे माझं वेगळेपण आहे. मी राजस्थानी मांडदेखील त्यांच्या पद्धतीने किंवा मिश्र ठुमरीच्या अंगानं म्हणते. माझ्या शिष्यांमध्ये माझी गायकी माझ्या वैशिष्ट्यांनी उतरावी असं मला वाटतं. पण थोडीफार खेदाची गोष्ट म्हणजे आज मुलींना तेवढी कसून मेहनत करण्याइतका दम तरी नसतो किंवा तसं वातावरण तरी नसतं, स्वास्थ्य नसतं. उर्दूचे, पंजाबीचे उच्चार हेही त्यांचं एक वैगुण्य नाकारता येत नाही. तरीही विद्या गोडसे, सरला भिडे यांच्याकडून मला यशाची उमेद आहे. मराठी मुलींनी ह्याही गायनप्रकार यशस्वीपणानं हाताळावा आणि त्यांच्यातून अनेक सवाई अख्तारीबाई निर्माण व्हाव्यात असं मला फार वाटतं. ●

# अखेर इथेही लय साधली आहे



लक्ष्मी शंकर

**वीस** वर्षांपूर्वी मी उत्तर हिंदुस्थानी संगीत गाणारी गायिका होईन असं कुणी सांगितलं असतं तर त्यावर कुणाचा—कुणाचा कशाला? अगदी माझा—देखील विश्वास बसला नसता. कारण अगदी बालपणापासून माझा कल होता नृत्याकडे. मी नृत्य शिकले होते. त्यात मला गती होती. भरतनाट्यम्वर मी बरच प्रभुत्व मिळवलं होतं आणि व्यवसाय म्हणूनदेखील जगविख्यात नर्तक श्री. उदयशंकर यांच्या नृत्यपथकात मी दाखल झाले होते. त्यांच्या या पथकावरोबर कार्यक्रमांच्या निमित्ताने सारा भारत मी पालथा घातला होता. नृत्याच्या अनुषंगाने कर्नाटकी संगीत मला अवगत झालं होतं. पण हिंदुस्थानी संगीताकडे मात्र मी मुळीच वळलेही नव्हते.

पण नृत्य हा संसारी स्त्रीचा व्यवसाय बनण्याची शक्यता आपल्याकडे तरी कमीच. माझंही तेच झालं. संसारात पडल्यानंतर नृत्याची तालीम कमी कमी होत अखेर बंद पडली. मी नृत्य सोडून दिलं. उदयशंकरांचे बंधु रविशंकर मला नेहमी आग्रह करीत, "तू शास्त्रीय संगीत शीक. देवदयेने लवचिक, पातळ, झारदार आवाज तुला लाभला आहे त्याच चीज कर." सुरुवातीला मी ते फारसं मनावर घेतलं नाही. पण रवीजींच्या आग्रहामुळं अनेक चांगल्या चांगल्या गायकांचं गाणं मी ऐकू लागले. मला या गाण्याची गोडी लागू लागली आणि अखेर गाणं शिकण्याचा मी निर्णय घेतला. पतियाळा घराण्याचे एक नामवंत गायक उस्ताद अब्दुल रहमानखाँ यांच्याकडे मी तालीम घेण्यास सुरुवात केली. माझं सुदैव असं की गाणं शिकायला सुरुवात करतानाच मला माझ्या आवाजाची जात, कुवत आणि झेप ओळखून त्या दृष्टीने शिकवणारे गुरू भेटले. स्वरांवर खाँसाहेबांचं बारीक लक्ष. किंबहुना पतियाळा घराण्यातच स्वराच्या सिद्धीला फार महत्त्व आहे. त्यांनी माझ्या आवाजाचा आवाका वाढवला. तयार करून घेतला. आज पांढरी सात या पट्टीत गाऊनही संपूर्ण तीन सप्तकात माझा आवाज सहजतेने फिरू शकतो. आवाजाची ही "रेंज" तयार करून घेण्याचं सारं श्रेय खाँसाहेबांकडे जातं.

१९५४ सालच्या जूनमध्ये मी खाँसाहेबांकडे तालीम घेण्यास आरंभ केला आणि उणीपुरी दोन वर्षंही पुरी होण्याआधीच खाँसाहेबांनी मला आकाशवाणीवर श्रवणकसोटी देण्यास सांगितलं. भीतभीतच मी त्यासाठी फॉर्म भरला. प्रत्यक्ष ऑडिशनच्या वेळी तर मी भलतीच नर्व्हस झाले होते. या परीक्षेत मी अनुत्तीर्ण

अनुक्रमणिका






होणार याची मला अगदी खात्री होती. ऑडिशन हॉलमध्ये बोलावल्यावर तर मला घाम फुटला होता. पण देवाचं नाव घे आणि खाँसाहेबांनी दिलेला धीर आठवीत मी गायला बसले संगीतातील दर्दी अशा सहा परीक्षकांचं मंडळ पलिकडल्या खोली माझं गाणं ऐकत आहे ही जाणीवच मला घाबरवून टाकायल पुरेशी होती. मला अवघी पंधरा मिनिटे दिली होती आणि पुरियाधनाश्रीचा ख्याल मांडायला सांगितला होता. मी गायल सुरुवात केली अन् मग मला घड्याळाचं भान राहिलं नाही चांगला अर्धा तास—त्याहूनही थोडा अधिकच वेळ मी तो राग गायला. द्रुत लयीतील ताना घेत असताना मध्येच थांबवून मल मुलतानीतील द्रुत चीज म्हणायला सांगितली. ती झाल्यावर ठुमरी ठुमरीनंतर खंभावती राग. आलटून पालटून वेगवेगळ्या रागांचं परीक्षा घेतली जात होती. मी आपली सांगतील ते गात होते खंभावती म्हणताना मध्येच थांबवून मला विचारण्यात आलं "तुम्ही म्हणताय हा नक्की खंभावती रागच आहे याची खात्री आहे?"

मी गडबडले. गप्प झाले. खरोखर मी म्हटला तो राग खंभावती नव्हताच मुळी. पण मला शिकवताना चुकून ते नाव सांगितलं गेलं होतं. मी तसं सांगितलं. सतत सव्वा तास माझी ही ऑडिशन चालली होती. ती संपवून बाहेर आल्यावर परीक्षकांनी माझं दिलदारपणानं आणि मनापासून अभिनंदन केलं. मला प्रथम श्रेणीत घोषित करण्यात आलं.

लागला त्या घटनेतून माझा आत्मविश्वास वाढीला अजून मी जाहीर समारंभात अगर मैफिलीत गायले नव्हत ती संधीही लवकरच आली. १९५७ सालच्या कलकत्त कॉन्फरन्सला मला गाण्याचं आमंत्रण आलं; आणि मी ते मोठ्या उत्साहानं आणि आनंदानं स्वीकारलं. दिवसातून आठ आठ तास मेहनत करू लागले. माझा पहिलाच जाहीर कार्यक्रम म्हणून मुंबईबाहेर न जाण्याचा आपला नेहमीचा शिरस्त मोडून उस्ताद स्वत: माझ्याबरोबर कलकत्त्याला आले होते कलकत्ता ही गायकवादकांची काशी. गाणाऱ्याचा कस तिथ लागतो. भारतभरचे या क्षेत्रातले नामवंत जाणकार तिथे उपस्थित झालेले असतात. त्यांच्यापुढे गायच्या कल्पनेनं मला कापरं भरायचं. पण उस्तादांनी मला धीर दिला. गाताना स्वत: हार्मोनियमवर साथ केली. मला पहिल्या दिवशी गाण्यासाठी अर्धा तास दिल होता. त्यावेळी मी 'मालकंस' म्हटला. आणि त्यापाठोपाठ काफी ठुमरी. त्या दिवशीचं ते गाणं असं रंगलं की गाणं संपताच प्रेक्षकातून एक सुवर्णपदक माझ्यासाठी जाहीर करण्यात आलं आणि पुन्हा दुसऱ्या दिवशी सकाळी गाण्याचं आमंत्रणही मिळालं. दुसऱ्य दिवशीच्या वर्तमानपत्रांतून त्या गाण्याबद्दल स्तुतिपर रकाने छापले गेले. पहिली वहिली असूनही माझी ती बैठक गाजली लक्षात राहिली. खाँसाहेबांच्या शिकवण्याचं चीज झालंसं मल वाटलं.

तेव्हापासून मी गाते आहे. भारताच्या कोनाकोपऱ्यात माझे जलसे झाले आहेत. अमेरिकेच्या दौऱ्याचीही संधी मला दोन वेळ मिळाली आहे.

तरीही अजून या क्षेत्रात मला बरंच मिळवायचं आहे, बरीच मजल गाठायची आहे याची मला जाणीव आहे. तो पल्ला गाठण्यासाठी आजवर झालं तसंच ईश्वराचं सहाय्य होत रहावं हीच माझी इच्छा आहे.

●●●








एक, दोन, तिसरी फियाट...चौथी टॅक्सी पण अँबॅसेडर. ती काळीभोर कोरी करकरीत ब्यूक छान आहे. आणि पुढची आता अगदी हळुहळू येतेय, ती हिलमन. दादाच्या गाडी-सारखी... दादा...



# क्षण.....एक पुरे.....!

**पहाट** फटफटायला लागली की उमा जागी होते. जागरणानं अंग कसकसत असतं. शिशासारखं जड झालेलं असतं. बळेच हुसकावून लावलेली झोप पुन: शरीराचा ताबा घेऊ पहात असते. तिला निग्रहानं फटकारीत उमा उठून उभी रहाते. बाहेर जवळच असलेल्या नळावर हंडेबादल्या खणखणत असतात. धुणी बडवली जात असल्याचे आवाज येतात. नळ आला आहे. आता वेळ काढून भागायचं नाही. उमा चूळ भरून चेहऱ्यावरून पाण्याचा हात फिरवते आणि कळशी उचलून घेते. अनीस दाराशीच अजगरा-सारखा पसरलाय, खर्जात सूर लावून घोरतोय. आधीच टीचभर असलेली खोली त्याच्या आडव्या शरीरानं आणखीच लहान वाटते आहे. अर्धवट काळोखात त्याला पाय लागू न देता उमा दार उघडण्याचा प्रयत्न करते. तो अर्थात् जमत नाही. उघडलेल्या दाराची फळी अनीसच्या पायाला घासत आत येते. अनीसला त्याची दाद नाही. घोरण्याची संथ लय सोडून तो कूस बदलतो तेवढाच.

पाणी भरून होतं, भांडी घासून होतात. खोलीत धूर कोंडू नये म्हणून बदामी कोळशांची शेगडी उमा बाहेर आणून पेटत लावते. निखारे रसरसल्यावर त्यावर भराभरा रोटचा शेकून घेते. गुळाची दाट चाय तैयार करून झाकून ठेवते आणि ; थैल्या, रेशनकार्ड काढून पैसे शोधू लागते. फळीवरच्या तिच्या डबीत जेमतेम तीन साडे तीन रुपये शिल्लक आहेत. तेवढ्यात सारं रेशन येणं शक्यच नाही. मघाशी नळावर पाणी भरताना रेशनवर बास्मती तांदूळ आल्याचं तिच्या कानावर आलं आहे. तांदूळ जाऊ देता कामा नयेत. उमाच्या नजरेसमोर सणा-वारी वाढलेलं ताट येतं. वाफा निघणारं, कढत भाताच्या मुदीवर पिवळं धमक वरण, लोणकढं, हळदीच्या पानाचा वास लागलेलं लोणकढं तूप, तांदळाच्या पिठाच्या कुरडया, पापडया, पोह्यांचे पापड, आंबोळ्या, मसालेभात, तांदुळाची खांडवी. तिच्यातल्या अस्सल कोकणस्थ भटणीची जीभ भाताविना आळली आहे.

सौ. निर्मला मोने

पण तांदूळ महाग आहेत आणि शिवाय अनीसला रोटीचंच अगत्य अधिक आहे. भात खायचा तर पुलावा बिर्याणी करून. उमा तांदूळ खरेदीचा बेत रहित करून पुन: पैशांचा हिशेब जमवू लागते. त्या तंद्रीतच रेशनच्या दुकानावर येते. तिथल्या रांगेचं टोक दुकानातून निघून कोपऱ्यावर वळून गल्लीत शिरलं आहे. उमा निमूटपणानं रांगेचं शेपूट धरते. मनातल्या मनात हिरमुसते. म्हणजे आता तिचा नंबर येईतो बारा वाजून जाणार. त्यापुढे दळण, मग घरी जाऊन सैंपाक. असंच परत जाऊन अनीस शेजारी झक्क ताणून द्यावी अशी एक सुखद कल्पना तिच्या डोक्यात चमकून जाते, आणि तिची असंभवनीयता लक्षात येऊन उमा स्वत:शीच हंसते. भुकेच्या वेळेला दुपारी अन्न समोर तयार नसलं तर अनीस काय थैमान घालील याचं चित्र तिच्या डोळ्या-पुढं उभं रहातं. कालचे पाठीवरचे वळ अजून पुसटले नाहीत...

समोर चाललेल्या कुजबुजीनं उमा सावध होते. .... "चांगली ब्राह्मणाची. . . . . . कॉलेजात होती हो. . . . भंगड







आहे नुसता. . . . . तशीच रहाते वाटतं लग्नाशिवायच. . . . तर हो, चक्क मुसलमान. . . . . . "

उमा चपापते. कुजबुज तिच्याचबद्दल आहे नक्की. सांगणारीचा चेहराही ओळखीचा आहे. तिच्या वर्गातल्या मीना सोनटक्केची काकू–शारदाक्का आहेत त्या. खास खाजगीतल्या आवाजानं हवा तसा परिणाम साधल्याचं समाधान त्यांच्या तोंडावर पसरलंय. उमा अधिकच अस्वस्थ होते. तीनचतुर्थांश रांगेचं लक्ष तिच्यावर खिळलं आहे. वेळ घालवायला तिचं चारित्र्य चघळायचं. त्या ओशट नजरांनी तिला पंधरा दिवस अंघोळ नसल्यासारखं अस्वच्छ पारोसं वाटू लागतं. तिच्या डोक्यात सणक जाते. संतापानं आणि असहायतेनं डोळ्यात पाणी जमू लागतं. ते खाली ओघळू नये म्हणून तिला पापण्यांच्या भिंती पोलादासारख्या वळकट कराव्या लागतात. क्षणभर ती भांबावते, काही न सुचून पिशवीतलं पाकिट चाचपू लागते. पुन: वर पहाते. शारदाक्का रांगेतली जागा सोडून तिच्याकडे मोहरा वळवून चाल करून येताहेत. हसत हसत, कनवाळूपणानं, "अगबाई, ऊर्मिला का ? पाहिलंच नव्हतं मी. दिसली नाहीस बऱ्याच दिवसांत? कॉलेज सोडलंस वाटतं ? बरं बिरं नव्हतं की काय ? आणि आज तू बरी रेशनला?" आपल्या बोलण्याची प्रतिक्रिया अजमावीत त्या आसपास न्याहाळतात.

उमाला कुठूनसं बळ येतं. प्रसन्न हंसून ती एकदम म्हणते, "इश्श, बरं नसायला काय झालं ? छान आहे प्रकृती





## शमा है रोशन शराबखाने की

**हयात फ़िक्रे–नशेमन में काटनेवालों**
**चमन का क्या कोई हक़–**
**अहले–आशियाँ पे नहीं ?**

**–आनंद नारायण 'मुल्ला'**

आपल्या देशबांधवांना उद्देशून कवि म्हणतो, "आपले आयुष्य घरटचाचीच चिंता करण्यात व्यतीत करणाऱ्यांनो ! काय, या उद्यानाचा घरटचात राहण्यावर कोणताही हक्क नाही ?

**उन के अहदे–शबाब में जीना !**
**जीनेवालों तुम्हें हुआ है क्या ?**

**–अज्ञात**

तिच्या तरुणपणाचा हा काळ आहे, तिचे तारुण्य बहरास आले आहे, आणि अजून तुम्ही जगत आहात ? अरे जगणारांनो तुम्हांला झाले आहे तरी काय ? (तुमचा कलिजा..............)

**अंदाज अपना आईने में देखते हैं जो।**
**और ये देखते है, कोई देखता न हो।**

**–निजाम**

ती आपले रूप...भाव...(एकांतात) आरशात निरखीत आहे. आणि हे सुद्धा पहात आहे की, कुणी पहात तर नाही ना ?

**मैं अकेला ही चला था जानिबे–मंजिल मगर**
**लोग साथ आते रहे और करवाँ**
**बनता गया–**

**–मजरूह सुलतानपुरी**

मी एकटाच माझ्या उद्दिष्टाकडे निघालो होतो, पण लोक माझ्याबरोबर येऊ लागले आणि काफिला तयार होऊ लागला.

माझी. आणि आताशी मीच तर येते रेशन न्यायला नेहमी. इथं जवळच रहाते मी. येता चहा घ्यायला ? कबाबपण केलेत. चटकन् जाऊन येऊ, अजून वेळ लागेल बराच नंबर लागायला."

शारदाक्कांचा चेहरा पडतो. कावऱ्याबावऱ्या होऊन भराभर मान आणि हात हलवीत त्या नुसत्याच नको नको म्हणत रहातात. उमाला हसू लोटतं. कसंबसं ते आवरीत ती शारदाक्कांचा दंड धरते. त्यांना हलवीत विचारते, "अक्का, तांदूळ बास्मती आलेत, पण मी सोडतेय. हवेत तुम्हांला ?" आणि थोडी थांबून स्वत:च म्हणते, "अय्या, पण तुम्हांला कसे चालणार मुसलमानाकडचे?" आणि पुन: हंसत सुटते.

कसनुसा चेहरा करून घाईघाईनं शारदाक्का आपल्या जागेवर जातात. रांगेतली माणसं तिची नजर टाळण्यासाठी इकडे तिकडे पाहू लागतात.

अकरा वाजायला येतात. उन्हाच्या चटक्यांनी डोकं तापतं, अनवाणी पाय पोळू लागतात. एकदा या आणि एकदा त्या पायावर उभी राहून थकल्यावर उमा सरळ हातातल्या थैल्या पायाखाली पसरते, पदर डोक्यावरून घेते आणि मनापासून रस्ता न्याहाळू लागते. रस्त्यावरून जाणाऱ्या मोटरी मोजण्याचा खेळ सुरू करते. एक, दोन, तिसरी फियाट, चौथी टॅक्सी पण अँबॅसेडर, ती काळीभोर कोरी करकरीत ब्यूक छान आहे आणि पुढची आता अगदी हेलूहेलू येतेय ती हिलमन. आभाळी. दादाच्या गाडीसारखी. उमाच्या पोटात खड्डा पडतो. दादाची गाडी. . . . दादाचीच गाडी ती. आपल्याच दिशेने येतेय. पांढरी डकची पॅंट आणि निळसर रेशमी रंगाचा मॅनिला घातलेला दादाच तो. शेजारी फिक्या जरीकाडाच्या साडीत ओठ रंगवलेली चित्रासारखी रेणू. . . आता वहिनी म्हणायचं तिला. लग्नाला बोलावलं नाही म्हणून काय झालं ? दादाचं लक्ष जाऊ नये म्हणून उमा मनोमन प्रार्थना करते, अंग चोरून






रांगेतल्या इतर लोकांच्या आड होऊ पहाते. अंगावरल्या पटकुराची तिला आता जाणीव होते. गाडीचा वेग कमी होतो. उमाचं तोंड कोरडं पडते. ओठ सुकतात. पण दादाचं लक्ष जात नाही. गाडीपुढे आडवं आलेलं पोरगं बाजूला पळत गेल्यावर तो पुन: स्पीड वाढवतो. कानाशी झुकलेल्या रेणूला हंसून काहीतरी सांगतो.

उमाच्या पायातलं वळ जातं. जीभ कडू होते. कसंबसं रेशन घेऊन ती भेंडाळल्या पायांनी दुकानाबाहेर येते. घरी येऊन उम्यानंच पेलाभर थंड पाणी ढोसते आणि गहू नीट करायला घेते. खरं तर अनीसला हे तिचं धान्य निवडण्याचं फॅड मुळीच पसंत नाही. 'मैं तो पत्थर भी हजम कर सकता हूँ' तो नेहमी ताठ्यात म्हणतो. पण उमालाच धीर होत नाही. रोटी संपवून अनीस कुठंतरी बेपत्ता झालाय पण पातेल्याखालील बरंचसं मटण झाकून ठेवलंय्. ती रेशनला गेल्यावर इस्माईल खाटकानं आणून दिलं असावं. अनीसला काल आकडा लागलेला दिसतोय.

जेमतेम अर्धी पायली गहू निवडून उमा ते दारात बैदुलांनी खेळत असलेल्या गफूरजवळ दळून आणायला देते. मटण चिरून शिजत लावते. कांदा, आलं-लसणीच्या वासानं खोली दरवळू लागते. आटा आल्यावर पोळ्या भाजून होतात. अजून अंघोळ झालेली नाही. उमाला पुन: एकदा खुदकन् हसू येतं. अनीसबरोबर दीड वर्ष राहूनदेखील अंघोळ झाल्याखेरीज जेवणाचा घास गिळत नाही आपल्याला. पत्र्याच्या बादलीत ती पाणी काढून घेते आणि दांडीवरची साडी ओढून घेऊन दरवाज्याला कडी घालते.

अडीच तीन वाजता भुकेजून अनीस परत येतो. हाततोंड धुवून खाण्यावर तुटून पडतो आणि मग सुस्तावून आडवारतो. जेवण वेळ टळून गेल्यामुळे उमाची भूक मेली आहे. उगीच अर्धी एखादी पोळी कुरतडल्यासारखी करून ती उरलेलं अन्न आवरून ठेवते आणि अनीसचा मलमली कुर्ता रफू करायला घेते.

झोप पुरी होऊन अनीस उठतो तेव्हा संध्याकाळ होऊ लागलेली असते. उमाला चहाची ऑर्डर देऊन तो पुन: बाहेर जातो आणि पाचदहा मिनिटांतच परततो. हातात चमेलीचे गजरे आणि मिठाईचे पुडे घेऊन. चहा पिऊन झाल्यावर शुक्रवार नसतानाही पाणी काढायला सांगतो. अंघोळीसाठी त्यानं वापरलेल्या चंदनी साबणाच्या सुगंधानं त्या एवढ्याशा खोलीतलं वातावरण सुवासिक होऊ लागतं. स्नान आटपून नेहमीच्या रंगीबेरंगी चौकडीच्या तहमदऐवजी जुईफुलासारखा पांढराशुभ्र लखनवी झब्बा आणि पायजमा पेहरलेला, किंचित् लांब केस वळवलेला अनीस एखाद्या परीकथेतल्या राजकुमारासारखा देखणा दिसतो. नेहमीच धुंद असणारे आपले लालसर डोळे किलकिले करून तो चमेलीचा एक गजरा स्वत:च्या डाव्या मनगटाभोवती गुंडाळतो आणि दुसरा उमेच्या भरघोस अंबाड्याभोवती माळतो. उमा शहारते, फुलते. त्याच्या हातावरच्या गजऱ्याची गाठ बांधते. तिच्या हातात हिन्याच्या अत्तराचा एक फाया देऊन तो कोपऱ्यात वळतो. फळीच्या तुकड्यावर उमेच्या सरस्वतीची चिमणी मूर्ती वीणा घेऊन उभी आहे. उमाकडे एक तृप्त कटाक्ष टाकून अनीस देवीपुढे उदबत्त्यांचा जुडगा पेटवतो आणि बरेच दिवस धूळ खात असलेला गवसणीतला तंबोरा काढतो, हळुवारपणानं कुरवाळून छेडू लागतो.

उमाच्या अंगावर रोमांच उठतात. सकाळपासूनचे श्रम, कष्ट, अपमान, उपहास, अवहेलना, खंत सारं सारं एखाद्या दु:स्वप्नासारखं विरून जातं. दारिद्र्याची लक्तरं ल्यायलेली ती कंगाल खोली पहाता पहाता हवेत विरघळते आणि तिथं लखलखत्या सुरांनी एक भव्य राजप्रासाद उभारला जातो. मोत्यांच्या लडीसारख्या दाणेदार ताना त्याचा चांदवा गुंफतात. ज्या सोनेरी क्षणावरून उमानं आपलं सारं आयुष्य, प्रतिष्ठा, नाती-गोती आणि अवघे शरीर कुरवंडून टाकलंय ते क्षण पुन: एकदा तिच्यासमोर साकार होतात. सुरांच्या त्या अमृतवर्षावात भिजून उमा चिंब होते, तृप्त होते आणि नकळत अनीसच्या घुमारदार, रुंद स्वरात आपला नितळ, चांदीच्या घंटीसारखा अणीदार सूर मिसळून गाऊ लागते, "रसिया आओ ना... !"

●●●



## मधुशाला

**चिराग-दैरो-हरम कब के बुझ गये ऐ 'जोश'**
**हनोज शम्मा है रोशन, शराबखानेकी।**

**—'जोश' मलिहाबादी**

अरे 'जोश' मुस्लिम धर्मस्थान (हरम) आणि मंदिरांतील दिवे कधीचे विझले, मालवलेले आहेत. फक्त मद्यशाळेतीलच ज्योती अजूनही प्रकाशित आहे.

**इससे बढ़कर दोस्त कोई दूसरा होता नहीं।**
**सब जुदा होते है लेकिन ग़म जुदा होता नहीं।**

**—'जिगर' मुरादाबादी**

जगात याहून (दु:खाहून) अधिक चांगला मित्र कोणताही नसतो. सारेजण माणसाला सोडून जातात. पण दु:ख मात्र कधीही साथ सोडत नाही.

**करवटें लेती है फुलों में शराब।**
**हमसे फ़स्ल में तौबा होगी।**

**—अज्ञात**

फुलांच्या शय्येवर मद्य पालटत आहे. अशा वेळी मी काय निवृत्तीच्या गोष्टी करीन?

**देख सकता है भला कौन ये प्यारे आंसू।**
**मेरी आँखों में न आजाये तुम्हारे आंसू।**

**—'अख्तरे' शीरानी**

ही प्रियतम आसवे कोण बरे पाहू शकेल? (मला तर अशी भीती वाटते की) माझ्या डोळ्यांत आता ही तुझी आसवे न येवोत.









अनुक्रमणिका







## नामधारी "स्वतंत्र"

"परमेश्वरा, त्यांना क्षमा कर, का की आपण काय बोलतो आहोत आणि काय करतो आहोत हे त्यांचे त्यांनाच कळेनासे झाले आहे."

स्पॅनिश पाद्री फेरर याच्या संबंधात सध्या 'स्वतंत्र' पक्षाचे 'परबुद्ध' नेते मधु मेहता व अन्य तथाकथित अन्याय विरोधकांची जी वक्तव्ये चालू आहेत, वा त्यांच्या नावावर जे लेखन प्रसिद्ध होत आहे ते पाहिले, वाचले की, परमेश्वराची वरील प्रमाणे आळवणी केल्याशिवाय अन्य उपाय उरत नाही. मधु मेहता आदि मंडळी ज्या हिरिरीने व क्विक्झोटी पद्धतीने फेरर महाशयांच्या हद्दपारीचा निषेध नोंदवीत फिरत आहेत ते पाहिले की, लोकमान्यांप्रमाणे "ह्यांचे डोके ठिकाणावर आहे काय?" असा जरा उग्र वाटणारा सवाल करण्याची बुद्धी होते. मार्च ऑफ द नेशन (टोवर्डस् व्हॉट? स्लेव्हरी?) ह्या स्वतंत्र पक्षाच्या मुखपत्रातून त्यांनी (मधु मेहता) लिहिलेल्या लेखात "फादर फेरर हेच खरे वैष्णव", असा निर्वाळा दिला आहे; तर पाच मे रोजी चौपाटीच्या वाळवंटात भाषण करताना त्यांनी विवेकानंद, सुभाष बाबू, डॉक्टर कोटणीस आणि बुद्ध यांच्या साक्षी काढल्या आहेत. मधु मेहता हे 'स्वतंत्र' पक्षाचे पुढारी आहेत असेच आजवर मी समजत होतो. परंतु त्यांचे लेखन व भाषण (फेरर प्रकरणापुरते तरी) वाचले की, ते नुकतेच एखाद्या चर्चमधून 'बाप्तिस्मा' घेऊन बाहेर पडले असावेसे वाटू लागते. बाटगा माणूस अधिक कडवा असतो असे म्हणतात. बाटगे मधु मेहता (व तत्सम परबुद्धीचे समर्थक) हे मूळ मनमाडकरांपेक्षा अधिक कडवे (व कडवटही) झालेले दिसतात. मनष्याचा तोल गेला की, त्याची तर्कबुद्धी व विवेकशक्ती त्याला सोडून जाते. आणि मग विवेकभ्रष्टांचा विनिपात शतमुखाने होत जातो. परकी मिशनरी फेरर हा म्हणे खरा वैष्णव. का की तो लाखांनी पैसा ओततो. मधु मेहतांना 'वैष्णव' शब्दाचा अर्थ कळतो काय? शिवाजीचा नजराणा नाकारणारा तुकाराम वैष्णव होता हे मधु मेहतांना ठाऊक आहे काय? संतश्रेष्ठ फेरर बावा हे लक्षावधी रुपये कुठून आणतात हो? आणि ही खिरापत वाटण्यासाठी ह्या वैष्णवाला आपला, लौकिक अर्थाने गुलाम देश सोडून इथवर येण्याचे आवतण कुणी दिले होते? वैष्णव भक्त मधु मेहतांनी तार केली होती, की मनमाडकर शेतकऱ्यांनी कागदावर आंगठे उठवून तारा केल्या होत्या– हा परकी पैसा ओतून उद्धारच करायचा झाला तर स्पॅनिश फेररला स्पेनचा उद्धार करायला काय हरकत होती? परकी मिशन्स व मिशनरी येथे येऊन जो पैसा ओततात तो कशासाठी हे कळण्यासाठी मेहताजी, नियोगी कमिशनचा अहवाल एकदा वाचा. पण छे: तुम्ही तो वाचणार नाही. आणि वाचला तर तो तुमच्या हृदयात जाऊन भिडणार नाही. कारण फेरर भक्तीने एकप्रकारचे अंधत्व तुम्हांला आलेले दिसते आहे. अन्यथा फेरर हाच खरा "वैष्णव" हा निर्वाळा तुम्ही का दिला असता? इकडेच सारे वैष्णव तद्दन दरिद्री होते. कारण द्रव्य हे विष ही भावना त्या वैष्णवांची होती. फेरर हा श्रीमंत वैष्णव आहे. म्हणूनच तो पैसे पेरून ख्रिस्त्यांचे पीक काढतो. विवेकानंदांचा दाखला मधु मेहता देतात. तो सारा प्रकारच अतिशय संताप-

जनक आहे. कहाँ राजा भोज और कहाँ गं
तेली. अहो मेहताजी, विवेकानंद चरि
जरा वाचा की! धर्म प्रसारार्थ ते अमेरि
केत कसे गेले, कसे हाल त्यांनी काढ
आणि उपेक्षित म्हणून वागविले ग
असतानाही अवघ्या सहा सात मिनिट
केवळ विद्वत्तेच्या जीवावर जग जिंकण्या
विक्रम विवेकानंदांनी केला हे तुम्हां
त्यातून कळेल. फादर फेरर प्रमा
एखादे 'मेहता मिशन' त्यांच्या पाठी
नव्हते. वा थैल्याही नव्हत्या. कोटणी
बुद्ध, सुभाष आणि विवेकानंद यां
नावे फादर फेदर प्रकरणी गोवून म
मेहतांनी फार मोठा राष्ट्रीय गु
केला आहे असे मला वाटते. राष्ट्री
अस्मितेचा अपमान तर त्यांनी केले
आहेच. पण एका परकीय पाद्र्याच
नादी लागून त्यांनी आमच्या राष्ट्रीय दै
तांची कुचेष्टाही चालू केली आहे. विवे
सुटला की माणसे अशी बरळतात. आ
फेररसाठी आकाशपाताळ एक करणाऱ्यां
एकच प्रश्न विचारावासा वाटतो व
नागा लॅण्ड आणि मिझो टेकड्या य
सध्या जे काही चालू आहे त्याचे निमि
अखेर ह्या फादरचे 'ब्रदर'च आहेत हे तुम्हां
ठाऊक नाही काय ? की फेररने पेरलेल
पैशाने आपण इतके लाचार झाल
आहोत. गरिबांचा कैवारच आ
असेल तर मेहतांनी येथल्या जनते
आवाहन करावे. मुरारजी वैद्य हे उद्यो
पती आहेत. त्यांनी व्यापक 'राष्ट्री
स्वार्था'ची भूमिका घ्यावी. पण फेर
सारख्या परकीय माणसाचे दासानुदा
होण्याचे पाप करू नये. परकीय माणसा
'न्याय द्या' म्हणणारे आणि त्यासा
राज्यही नष्ट होईल इथपर्यंत उद्दा
उद्गार काढून राष्ट्राच्या प्रतिष्ठेला
चूड लावणारे हे सारे महाभाग अखे
यात कोणते राष्ट्रहित साधणार आहेत
एखाद्या परकी माणसाचे अस्तित्व उ
कारक हे ठरविण्याचा अधिकार शास
नाचा की ज्याने आत्ताच कुठे त्या
पाहिले त्या चौपाटीवरच्या बघ्याचा. राज
शासनाने संपूर्ण चौकशी केली. दिल्लीश
बोलणी केली. मग आज्ञा दिली. आ





अनुक्रमणिका

मुदतवाढीनंतर महाराष्ट्र शासनाची भूमिका बरोबर होती असाच निष्कर्ष दिल्लीकरांनी काढला आहे. दिल्लीचे गुप्तचर खोटे आणि चौपाटीकर मेहता-वैद्य मात्र महान सत्यवादी असेच येथील जनतेने मानायचे काय ? स्पेन वा अमेरिकेत एखाद्या परकीय, अनवॉंटेड माणसाला वचावाची संधी दिली जाते काय? त्यांचा तो नैतिक अधिकार मानला जातो काय ? मग फेररसाठी ही माणसे कोणत्या तोंडाने ही मागणी करीत आहेत? ह्याच काळात फेररच्या नावे आलेले लक्षावधी रुपये कुठल्या देशकारणी ( वा भारतहितकारणी ) खर्च झाले ह्याचा जवाब मधु मेहता देतील काय? ब्रिटिशांचे राज्य ज्या पायऱ्यांनी आले व स्थिरावले त्याचा ह्या मंडळींना येवढ्यातच विसर पडला? एका परक्या फंदी फेररसाठी ही माणसे खुशाल 'राज्य नष्ट होईल' असे शाप देईपर्यंत धारिष्ठ्य दाखवू शकतात ? हे वैष्णव फेरर व त्यांचे हे वैष्णवजन ह्या मंडळींनी एकदा आपली 'नीती' तपासून पहावी. आणि त्यांचे हे जगदोद्धाराचे पवित्र कार्य स्पेन वा अन्य देशांतच सुरू करावे. कारण स्पेनमध्येही आलबेल नाही हे काय आम्ही फेररवाद्यांना सांगायला हवे ? ते तर परमेशाचे प्रेषित. येशूच्या चालीवर त्यांनी आताच बोलायला सुरुवात केली आहे. तेव्हा हे उद्धारक महापुरुषा, तू लवकर स्वगृही गमन कर. का की तेथे तुझ्या कार्याची अधिक गरज आहे. सेवक कमी पडत असल्यास ह्या देशातली विकली जाणारी जी माणसे आहेत, त्यांची एकादी पलटण हवी तर घेऊन जा.

आता आम्हांला वैष्णव नको आहेत. क्षत्रिय हवे आहेत. भिक्षांदेहीवर जगणाऱ्या स्वाभिमानशून्य संतानापेक्षा स्वाभिमानी मरण पत्करणाऱ्या क्षत्रियांची पैदास करण्याचा संकल्प ह्या भूमीने शास्त्रीजींच्या नेतृत्वाखाली केला आहे हे आपणास विदित व्हावे.

राज्य शासनाने घेतलेली भूमिका योग्य आहे. महाराष्ट्राने फेररचा कलंक धुवून काढलाच पाहिजे. ते एक शिवकार्य समजून केले पाहिजे. मग मेहता वैद्यांना राग आला तरी ! हा लढा धार्मिक नाही. परकीय व भारतीय शासन ह्यातील हा तात्विक व राजकीय लढा आहे असेच मी मानतो. दिल्लीने टाकलेले पाऊल भ्रान्तचित्त अवस्थेचे द्योतक मानावे लागेल. त्यातून आपलेच राज्यशासन हास्यास्पद ठरते हे ध्यानी घेतले जावे.

## कच्छचा विचित्र योग (व भोगही)

कच्छच्या 'भूमिदाना'बद्दल गेल्या अंकी लिहिले होतेच. आता कच्छची भूमी देण्याबद्दलचा जनता–विरोध व्यक्त करण्यासाठी एक आंदोलन सुरू झाले आहे. राष्ट्र रक्षण तर धड करता येत नाही. गेल्या वीस वर्षांत आपण कमावले काय आणि गमावले किती ह्याचा हिशोब










काढला तर पब्लिक अकाउंटस् कमिटी राज्यकर्त्यांनी राजीनामे द्यावेत अशीच शिफारस करण्याची शक्यता अधिक आहे. हे शांततामय भूमिदान मूकपणे सहन न करणारी माणसे आज दुर्दैवाने विरोधी पक्षात आहेत. (खरे तर ह्यांची फार मोठी संख्या शासकीय पक्षात असायला हवी होती. असतीलही. पण 'मृदुलेप' बसल्यामुळे हे मृदुंग फक्त "होय ! बरोबर !" म्हणताहेत. एकच बोल त्यातून निघतो, "जय इंदिराजी !") पण एकही इंच जागा शत्रूला देणार नाही असं वचन देणारे शास्त्री गेले. आणि आता 'ती भूमी आपली नव्हतीच. तेव्हा घटना दुरुस्तीची गरज नाही' असे म्हणणारे बोटचेपे राज्यकर्ते गादीवर आले आहेत. ती भूमी तुमची नव्हतीच तर १९६५ साली तिथे सैनिक का घातले ? रण-साहित्य का वापरले ? माणसे का मरू दिली ? जागतिक न्यायालयाचा खर्च का केलात ? पण हे प्रश्न विचारण्यात अर्थ नाही. म्हणून शेवटी कच्छ भूदान विरोधी आंदोलन सुरू झाले आहे. ह्या विषयावर स्वकीय शासनाविरुद्ध आंदो-लनासारखा मार्ग आचरावा लागतो हेच मुळात दुर्दैव आहे. झोपेचे सोंग करणारांना जागे कोण नि कसे करणार ? कच्छच्या ज्या वार्ता येत आहेत. जे 'अनुभवी' लेखन प्रसिद्ध होत आहे त्यावरून आपण लष्करी-दृष्टया किती महत्त्वाचा प्रदेश गमावून बसलो आहोत त्याची कल्पना येते. "कच्छचे दान दिले आता आसाम, नागा-लॅण्डचे कधी देणार" असा प्रश्न कच्छच्या रणात रणरणत आहे. शिपाई लाजतात. शरमेने माना खाली घालतात. पण ह्याची लाज शासनाला नसल्याने त्यांना कटु कर्तव्य करावे लागते आहे. खुद्द कच्छचे महाराज कुमार आता ५००० सत्याग्रहींचे नेतृत्व करणार आहेत. ते मुंबईत म्हणाले की कच्छबाबतच्या सर्व धोक्याच्या सूचना शासनाने दुर्लक्षिल्या म्हणून ही वेळ आली आहे. आसामबाबतचे सर्व इशारे वांझ ठरले आहेत. इशारे देणारे "जातीय" ठरले आणि अवघ्या चार तासांत गौहत्तीत कोटय-वधींचे नुकसान योजनापूर्वक घडवून आणणारांबाबत शासन गाफील राहिले आहे. चालिहा, त्रिपाठी आता लाल कंदिल दाखवीत फिरताहेत. पण ह्या शक्तीबाबत दिलेले इशारे त्यांनीही दुर्लक्षिले हा इतिहास आहे. प्रत्येक धोक्याची आगाऊ जाणीव दिली गेली. चीनच्या आक्रमणा-बाबत, तिबेटबाबत, लडाख-अकसाई-चीन बाबत, कच्छबाबत, काश्मीरबाबत इशारे दिले गेले. पण दिल्ली शासक नेहमीच गाफील राहिले. जबर किंमत देऊन आणि भूमी गमावून आम्ही प्रत्येक पाठ शिकलो आहोत. आणि चीन–पाकबाबत अजून वांझोटया आशा बाळगीत आत्मसमाधान करून घेत आहोत. कोसिजिन येऊन जातात. नवी आशा पेरून जातात. आणि पूर्व पाकमधून दोनहजार सशस्त्र माणसे उठतात आणि आमच्या खेडयांत शिरून हैदोस घालतात. हितशत्रूंना हार आणि देशभक्तांना मात्र बंदिशाळा असा विचित्र प्रकार दिसतो. मधु लिमयांचा तेरा वर्षांचा मुलगा कच्छच्या रणमैदानात उतरला, आणि असंख्य महिला व ७५ वर्षांचे वृद्धही त्यात उतरले. एकात्मतेच्या परिषदा भरवून एकात्मता उत्पन्न होत नाही. ती देशाला दिल्या जाणाऱ्या आव्हानाच्या प्रसंगी उत्स्फूर्तरीत्या बाहेर येते. तिचे कौतुक व अभिनंदन करण्याऐवजी शासन जेव्हा "कसा झकास प्रदेश गमावला—रक्त न सांडता" अशा आत्मकौतुकात रममाण होते तेव्हा मन विद्ध होते. पेशावरचा अमेरिकन तळ हेरगिरीसाठी वापरला जातो. आमच्या हेरांना कळत नाही. शासन कुंभकर्णी झोप घेत राहते. कुणी लक्षात आणून दिले की, काहीतरी उत्तरे देऊन 'प्रसंग' साजरे होतात. हे सारे स्पृहणीय खासच नाही. कच्छचे आवाहन हे राष्ट्रीय आवाहन आहे. पक्षीय नाही. शासनाने घेतलेली भूमिका उपेक्षेची आहे. गोवा सत्याग्रहाचे वेळी मोरारजींनी जी भूमिका घेतली होती तीच भूमिका गुजराथ शासनाने घेतली आहे. पण तरीही माणसे जात आहेतच. कारण 'देशभक्ती' हा त्यांचा 'धंदा' नाही 'स्वभाव' आहे. 'शरणागती' हा त्यांचा स्वभाव ना[illegible] स्वकीयांना लाथा आणि लियाकत[illegible] लोटांगण हा नवा राष्ट्रधर्म त्यांना मा[illegible] नाही. कच्छच्या रणात केवळ कच[illegible] बाबतची शरणागतीची भूमिकाच के[illegible] आव्हानिली गेलेली नाही. एकूण स[illegible] लोटांगणवादाला हा शेवटचा धक्का आ[illegible] लोटांगणवाद सरेल तेव्हाच खऱ्या अर्थ[illegible] हा लढा संपेल.

## 'आलमगीरा'चा अस्त

मराठी दैनिकांच्या साप्ताहिक आवृ[illegible] निघू लागल्या आणि 'साप्ताहिकां'[illegible] नरडीला नख लागले ही काहीशी वस[illegible] स्थिती आहे. आज जी काही साप्ताहि[illegible] तगून आहेत ती लेखन गुणापेक्षा 'पक्षी[illegible] पाठिंब्यावरच तगून आहेत असे म्हटल्य[illegible] वावगे ठरू नये. साधना, विवेक, ऑ[illegible] नायझर, न्यू एज वगैरेंचा ह्या संदभ[illegible] उल्लेख करता येईल. ह्या साप्ताहिक[illegible] लेखनसाहित्य 'गुणी' नसतेच असे म[illegible] म्हणावयाचे नाही. पण पुण्याई पाठी[illegible] नसती तर आजच्या 'दैनिकी' साप्[illegible] हिकांच्या स्पर्धेत यातली कितीशी टिक[illegible] राहिली असती याविषयी शंका वाट[illegible] 'आलमगीर' साप्ताहिक बंद करण्यात अ[illegible] आहे. विविधवृत्तातून आलमगीर निघा[illegible] आता दोन्हीही पत्रे अस्तित्वात नाही[illegible] 'आलमगीर' ला 'लौकिक' यश कधी मिळ[illegible] नसले तरी काही चांगल्या परंपरांसा[illegible] ते हवे होते असे वाटते. खुद्द बावडेकरां[illegible] आपल्या लेखणीने तो वाचक निम[illegible] केला होता. बावडेकरांच्या लेखणी[illegible] असामान्य पत्रकर्तृत्व दडले आहे [illegible] मानणारांपैकी मी आहे. ती परख[illegible] आहे. बोचरी आहे. उपरोध, उपहा[illegible] घणाघाती आवेश आणि ओज तिच्य[illegible] आहे. ती अन्यायावर आग ओकू शक[illegible] ती १०० टक्के राष्ट्रवादी आहे. महारा[illegible] निष्ठा हा राष्ट्रनिष्ठेचा एक अविभा[illegible] घटक आहे असे ती मानते. (आणि मी[illegible] मानतो.) आलमगीर कुठल्याही पक्षा[illegible] नव्हता. अवघ्या देशाचा होता. प[illegible] आजच्या 'पक्षीय' जमान्यात त्याचा टिका[illegible] लागणे शक्य नव्हते. पण केवळ आपल[illegible] लेखणीने तो 'वाचनीय' करणारे बावडेक[illegible] हे पत्रसृष्टीत अमर राहतील.

तरीही पण 'आलमगीर' बंद पडले आ[illegible] स्पर्धा कठिणच होती. बावडेकरांच्या लेख[illegible] गुणांचा कुणीतरी चाणाक्ष संपादकाने उप[illegible] करून घेतला पाहिजे असे सुचवावेसे वाट[illegible]

—सारस्व[illegible]











## एक आगळा हुतात्मा

**तीनएक** महिन्यांपूर्वी येथील ऑक्सफर्ड व केंब्रिज सोसायटचांनी उच्च वाङ्मयमूल्यांनी नटलेले असे एक नाटक सादर केले. त्याचे नाव 'द डेव्हिल्स.' त्याचा लेखक जॉन व्हायटिंग हा काही वर्षांपूर्वी ऐन तारुण्यातच मरण पावला. व्हायटिंगचे सदर नाटक आल्डस हक्सलेच्या एका विख्यात कादंबरीवर आधारलेले आहे, आणि हक्सलेच्या कादंबरीला सतराव्या शतकात फ्रान्समधील लूदन या गावी प्रत्यक्ष घडलेल्या काही प्रकारांची पार्श्वभूमी लाभलेली आहे. 'द डेव्हिल्स'च्या गुणवत्तेचे श्रेय म्हणूनच हक्सलेसारखा तपोवृद्ध कादंबरीकार आणि व्हायटिंगसारखा अकाली निधन पावलेला असामान्य प्रतिभेचा नाटककार या दोघांत थोड्याफार सारख्या प्रमाणात विभागून द्यायला हवे.

लूदन गावचा पाद्री ग्रांदिए हा या नाटकाचा नायक. ग्रांदिए हे पात्र भारतीय नीतिकल्पना जीवापाड जपण्याच्या नादात कला-विचाराला पारख्या होणाऱ्या प्रेक्षकाला नीटसे समजायचेच नाही, कारण आसुरी आणि दैवी संपत्ती त्याचे ठायी एका आगळ्याच प्रकारे एकवटलेल्या आहेत. परमेश्वराशी तो विनासायास आपल्या मनाचा संपर्क साधीत असतो, परंतु ते करीत असताना रूढार्थाने आपण ज्याला पापमार्ग समजू, त्या मार्गाने जायलामुद्धा तो कचरत नाही. ग्रांदिए हा मूलत: जीवनाच्या विविध उन्मेषांचा चाहता आहे, भोक्ता आहे. प्रेम हेच त्याचे तत्त्वज्ञान आहे; परंतु पाद्री असूनही या प्रेमाला स्त्रीसौख्याची वाट मोकळी करून द्यायला तो मागेपुढे पाहात नाही

## 'रनेसांस' ची पार्श्वभूमी

सोळाव्या व सतराव्या शतकातील रनेसांस-युगात युरोपात एका नवमानवाने जन्म घेतला. खगोलशास्त्रात झालेल्या क्रांतीपाठोपाठ तो अनुभूतीचे एक विराट जग पादाक्रांत करू पाहात होता; अक्षरश: आकाशाला गवसणी घालण्याचा त्याचा प्रयत्न होता. एका बाजूने आपल्या अवघ्या नैसर्गिक प्रवृत्तीभोवती पडलेला रूढ धर्मविचाराचा विळखा त्याला सैल करायचा होता तर दुसऱ्या बाजूने विज्ञानाची, तत्वज्ञानाची मदत घेऊन जीवनविषयक सत्याचा संपूर्णतर शोध घ्यायचा होता. या दोन्ही प्रयत्नांचा अतिरेक होता होता तो आपल्या मानवी सहजप्रवृत्तीच गमावून बसण्याची शक्यता होती.

ही तत्कालीन वैचारिक व ऐतिहासिक पार्श्वभूमी आपल्या परिचयाची नसेल तर 'द डेव्हिल्स' या नाटकाचे पोत आपल्याला अगदीच साधे वाटेल. ग्रांदिएविरुद्ध चुगल्या करणारे त्यातील रसायनतज्ज्ञ व शस्त्रक्रियाविशारद हे बुद्धिनिष्ठ जीवन प्रणालीच्या कोंडीत सापडून असहिष्णु बनलेल्या तत्कालीन विचारवंतांचे नमुने आहेत. उलट ग्रांदिए हा स्त्रियांच्या बाबतीत चांगलाच स्खलनशील असला तरी त्याच्या अंगी साधुत्वही नाटकाच्या सुरुवातीपासूनच आहे. नाटकाच्या अखेरीच्या त्याच्या हौतात्म्यामुळे हे साधुत्व मनात पक्के बिंबते एवढेच. खरे म्हणजे ग्रांदिएच्या स्वभावचित्राची ही मनाला बुचकळ्यात टाकणारी अनेकपदरी रचना हेच या नाटकाच्या श्रेष्ठतेचे गमक आहे.

## नैसर्गिक प्रवृत्तींशी इमानदारी !

लूदन गावातील मठात राहणाऱ्या जोगिणी एकाएकी अंगात आल्यासारखे करू लागतात. ग्रांदिएच्या मुक्त प्रेमजीवनामुळे त्याच्या-वर जळफळणारे नागरिक त्याच्यावर असे बालंट आणतात की, सैतानाच्या साह्याने त्यानेच या योगिणीवर मोहिनीमंत्र टाकलेला आहे. फ्रेंच धर्मसंस्थेचे प्रमुख येऊन चौकशी करतात आणि ग्रांदिएला दोषी ठरवतात. जो गुन्हा आपण केलेलाच नसतो तो कबूल करण्याचे तो नाकारतो आणि फाशीची शिक्षा पत्करून आपले स्वत्त्व सिद्ध करतो. ग्रांदिएला नाटककाराने अशा रीतीने हौतात्म्याच्या दिव्य-त्वाची प्रचीती देऊ केली आहे. पाश्चात्य साहित्यात अशा प्रकारे धर्म-संस्थेचा छळ पत्करून बलिदान करणाऱ्या हुतात्म्यांपेक्षा ग्रांदिए वेगळा वाटतो तो नैसर्गिक मानवी प्रवृत्तोंशी त्याने राखलेल्या इमानामुळे !

ही नुसतीच ग्रांदिएची कथा असती तर नाटक श्रेष्ठ म्हणण्याचे कारण नव्हते. मराठीतील प्रमुख जोगीण सिस्टर जान हिचे स्वभावचित्र नाटकात ज्या प्रकारे उभे केलेले आहे तेही अभ्यासण्या-जोगे आहे. सुरुवातीला तीही धर्मसंस्थेच्या चाकोरीत अडकलेली असते, परंतु ग्रांदिएला सामोरे जात असतानाच तिच्या सदसद्विवेक-बुद्धीला हलकेच उजाळा मिळत असतो. आणि अखेर ग्रांदिए मान ताठ ठेवून हौतात्म्य पत्करतो तेव्हा सिस्टर जानच्या मनातील अनेक आशंकांचा स्फोट होतो, अन् ती त्याच्या नावाने टाहो फोडते. ग्रांदिए आणि सिस्टर जान ही दोन्ही एकाच आध्यात्मिक समस्येच्या झंझावातात हेलकावे खाणारी पात्रे आहेत, आणि त्या दोघांच्या व्यक्तिमत्त्वातील साम्यविरोध व त्यांचे परस्परांचे मूक आणि गूढ असे असलेले नाते यांचा नाटचवस्तूच्या परिपोषाला फार मोठा हातभार लागलेला आहे.

ग्रांदिएविरुद्ध उभ्या ठाकलेल्या धर्मसंस्थेचे व राज्यसंस्थेचे प्रतिनिधी एकाच साच्याचे नाहीत. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील सूक्ष्म फरक नाटककाराने फारच खुबीने रंगविलेले आहेत. विशेषत: ग्रांदिएला अखेर 'क्षमा माग' असे आवर्जून आवाहन करणारा सरकारी अधिकारी माणुसकीला अगदीच पारखा झालेला नाही.






हे विशिष्ट स्वभावचित्र एखाद्या सामान्य प्रतीच्या नाटककाराने अगदीच ठोकळेबाज केले असते. 'देवाला शरण जा !' असे अखेरच्या क्षणी ग्रांदिएला सांगताना हा अधिकारी जो युक्तिवाद करतो त्यात त्याच्यासारख्या व्यवहारवाद्याची तडजोडीची विचारप्रणाली नेमकेपणे उतरलेली आहे. त्या प्रणालीच्या पार्श्वभूमीवर ग्रांदिएची स्वत्त्वनिष्ठा विशेषच उठून दिसते.

## गहन नाटकाचा चांगला प्रयोग

प्रयोग करायला 'द डेव्हिल्स' हे नाटक अतिशय कठीण, याचे कारण ही नाट्यवस्तूची गहनता ! असे असूनही जॉन स्मिदार्ड व डेरेक बॉन्ड यांनी हे नाटक बसवले ही कौतुकाची गोष्ट आहे ! ब्रायन जोन्स हे त्यांचे नेहमीचे नेपथ्यकार. व्हायटिंगच्या नाटकातील प्रवेश अगदी छोटे छोटे आहेत, आणि त्याची गती जर अखंड राखली नाही तर प्रयोगात शैथिल्य येईल. जोन्स यांनी उभारलेल्या सेटमध्ये चर्चच्या अंतर्भागाची झांक होतीच पण प्रवेशागणिक बदलणाऱ्या लूदन गावच्या व पॅरिस या राजधानीच्या शहराच्या भिन्न परिसराची सूचनाही समर्पकपणे देण्याची व्यवस्था होती.

ग्रांदिएचे काम डेरेक बॉन्ड यांनी मन लावून केले, परंतु या स्वभावचित्रातील भोगवादी अंश त्यांनी पुरेसा प्रेक्षकांच्या मनात ठसविला नाही. अर्सुला प्रिन्स या एक उत्तम नटी आहेत; सिस्टर जानची भूमिका त्यांनी वास्तव शैलीत रंगविली. या नाटकात अनेक पात्रे आहेत. मिनू छोई, बोमी कापाडिया, जर्सन दा कुन्हा व कर्सी कात्रक हे थिएटर ग्रूप (व पूर्वी थिएटर युनिट) या संस्थेच्या नाटकातून काम करणाऱ्या नटांनी आपले सारे कसब पणाला लावून यातील प्रमुख दुय्यम भूमिका वठविल्या.

एक उत्तम नाटक व त्याचा पहिल्या प्रतीचा प्रयोग असे 'द डेव्हिल्स'चे वर्णन करता येईल. याच संचाने काही वर्षापूर्वी आनुईचे 'बेकेट' हे गाजलेले नाटक सादर केलेले होते. जास्त चपखल भूमिकायोजनेमुळे त्याचा प्रयोग आजवर स्मरणात राहण्याजोगा झाला होता. मध्यंतरी सर टॉमस मोरच्या जीवनावर आधारलेल्या रॉबर्ट बोल्टच्या 'अ मॅन फॉर ऑल सीझन्स' या नाटकाचा एक अविस्मरणीय प्रयोग येथे आलेल्या ब्रिस्टल ओल्ड व्हिकने सादर केलेला होता. ही तीनही नाटके हुतात्म्यांच्या जीवनावर आधारलेली आणि तरीही भिन्न स्वभावचित्रे सादर करणारी. ही तीनही नाटके पाहणे हा एक सर्वांगपरिपूर्ण साहित्यिक व आध्यात्मिक अनुभव होता; ज्यांना तो लाभलेला नाही त्यांनी निदान ही नाटके वाचून त्या अनुभवाप्रत जाण्याचा प्रयत्न करावा.

● ● ●

## कोपिटची 'ब्लॅक कॉमेडी' !

एप्रिल महिन्यात थिएटर ग्रूपने सादर केलेले, 'ओ डॅड, पुअर डॅड्, ममाज हंग यू इन द क्लोजेट अॅन्ड आय् अॅम फीलिंग सो सॅड' या लांबलचक नावाचे आर्थर कोपिटचे नाटक तर अनाकलनीय वाटण्याइतपत वेगळ्या धर्तीचे होते. नाटकाच्या या नावाचा अनुवाद 'अहो बाबा, बिच्चारे बाबा ! आईने तुम्हांला कपाटात ठेवलेय् अन् मला किती वाईट वाटतंय म्हणून सांगू !' अस शकेल. ज्या दिवशी मराठी रंगभूमीवर या नावाचे नाटक येई दिवशी न-नाट्य आपल्या इथे स्थिरावलेच समजा !

कोपिटच्या नाटकाचे कथानक हवाना या क्यूबाच्या राजधा एका हॉटेलात घडते. प्रथम हे सांगितले पाहिजे की सबंध आपल्याला परिचित अशा वास्तवाच्या पातळीवर बिलकूल नाही. सतत एखाद्या बहिर्गोल अगर अंतर्गोल भिंगातून वास्त पाहावे अशा त्यातील घटना वाटतात. त्यात जसा मनाला गु करणारा उपहास आहे तसेच काळजावर वस्तरा फिरविणारे भीषण असेही नाट्य आहे. जे जे काही घडते ते एखाद्या विचित्र स्वप्नात घडल्यासारखे वाटते.

एवढे वर्णन करूनही कोपिटच्या नाटकाचा प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज 'बापाला कपाटात टांगण्याचा' हा काय प्रका ते तुम्हांला कळणार नाही ! नाटक सबंध पाहूनही त्यात झालेल्या गहनतर अनुभूतीची सारीच्या सारी कोडी उलग नाहीत !

रोनाल्ड फरबॅन्क नावाच्या कादंबरीकाराच्या औपहा नर्मविनोदी कादंबऱ्या तुम्ही वाचल्या असतील तर कोपि नाटकातील मादाम रोझपेटल ही श्रीमंत विधवा तुम्हांला पू चयाची वाटेल. आजवरच्या नाट्यसहित्यात अशा प्रकारचे तुम्ही पाहिलेले नाही हे निश्चित् ! हवानामधल्या उपरिनि हॉटेलात राहायला येताना ती आपल्याबरोबर आपल्या नव पेंढा भरलेले प्रेत घेऊन येते बेडरूममधील कपाटात ठेवण्यासाठी ! परस्त्रीच्या मिठीत तो म्हातारा तिच्याशी बेड करीत असताना तिने त्याचा निकाल लावलेला असतो. त्य पश्चात् आपल्या अर्धवट बुद्धीच्या तरुण मुलाला तिने ए गुलामासारखे वाढविलेले असते.

या मुलाचा, जोनाथनचा, अर्धवटपणा हा सारखे आ धाकात राहिल्यामुळे निर्माण झालेला असतो. हॉटेलात र राहायला येऊन फार दिवस होताहेत न होताहेत तोच रो नावाची एक तरुणी या मुलाला आपल्या प्रेमपाशात ओढू प मादाम रोझपेटल बाहेर गेल्यावेळी ती त्याला बेडरूममध्ये जाते— या बेडरूममध्ये परक्या माणसाने पाऊलदेखील ट जोनाथनच्या आईला खपत नाही ! — आणि त्याला मंचव ओढते ! तिचा मोहपाश झुगारून देण्याच्या केविलवाण्या प्रय जोनाथनकडून तिचा खून होतो, आणि त्यामुळे त्याच्या मनाला धक्का बसून तो आत्महत्त्या करून घेतो !

या घटना समजायला सोप्या वाटल्या तरी नाटकात त्या ज्य प्रतिकात्मक संदर्भात घडतात त्यामुळे प्रत्यक्षात त्या साध्या, वाटत नाहीत ! रोझाली जोनाथनच्या गळ्यात पडल्यावेळी प्र खेपेस त्याला सावध करणारे, कर्कशपणे ओरडणारे एक 'कुकू-क्ल स्पर्श करताच माणसाला आपल्या राक्षसी मगरमिठीत ओढणारे

फुलझाड, मत्स्यपात्रातील एक पाळीव मासा .... अशा प्रकारची 'पात्रे'सुद्धा कोपिटच्या नाटकात आहेत. घटनांना व संवादांना तो वेळोवेळी ज्या पद्धतीने रंगमंचावर राववतो तिला 'सरिआलिस्ट' शैली असे म्हटल्यास वावगे होणार नाही. मात्र या साऱ्या न-नाट्यात आपल्याला ओझरते का होईना परंतु सुसंगतपणे प्रतीत होणारे शैलीच्या एकात्मतेचे एक सूत्र आहे, आणि म्हणूनच नाटक जरी अंशतःच आपल्याला 'कळले' तरी काही न्यून मानण्याचे कारण नाही.

हॉटेलात मादाम रोझपेटल कमोडोर रोझेबॉव्ह नावाच्या थेरड्याला गाठते नि त्याला झुलवीत ठेवते. आपल्या नवऱ्याच्या मृत्यूच्या गोष्टी त्याला ऐकवून त्याच्या काळजाचा थरकाप झाला की मग गंमत पाहते ! या दोन तथाकथित प्रियजनांचे हे विकृत प्रेमप्रकरण आणि जोनाथन व रोझाली यांचे बव्हंशी निरागस संबंध यांच्यातील विरोध नाट्यवस्तूच्या गाभ्यासारखाच वाटतो ! नाटकातील प्रमुख पात्रे ही चारच.

कोपिटच्या नाटकाचा उत्तरार्ध अतिशय भीषण असूनही नाटक 'विनोदी' आहे. 'ब्लॅक कॉमेडी' या नाट्यप्रकाराचा आपल्याला फारसा परिचय नाही, कारण विनोदाबद्दलच्या आपल्या कल्पनाच फार मोठ्या भाबड्या आणि सीमित आहेत. भीषण नाट्य आणि किंचित् क्रूर असा औपहासिक विनोद यांचे मिश्रण असल्या 'ब्लॅक कॉमेडी' मध्ये विनासायास होत असते. 'ओ डॅड...' हे नाटक असल्या नाट्यप्रकाराचा एक आदर्श समजले पाहिजे.

अलीक पदमसी यांनी या नाटकाचे दिग्दर्शन आपल्या लौकिकाला साजेसे केलेले होते. त्यांच्या पत्नी पर्ल पदमसी या एक फारच कसबी नटी आहेत; मादाम रोझपेटलचे त्यांनी काढलेले सोंग नाटककाराला अभिप्रेत असलेल्या व्यंगचित्रावरहुकूम वाटत होते. सिल्व्हेस्टर दा कुन्हा (कमोडोर), रघू सुदन (जोनाथन) व सबीरा मर्चंट (रोझाली) यांची कामेही अपेक्षेप्रमाणेच मनात खोलवर ठसण्याजोगी झाली.

नाटकाचे नेपथ्य खुद्द पदमसी यांचेच होते. ते शैलीदार तर होतेच पण 'कुकू-क्लॉक' व राक्षसी फुलझाड यांचे 'इफेक्टस्' त्यांनी बेमालूम साधलेले होते. नाटकाची वेगळी जात ओळखून त्यांनी योजिलेले विविध धर्तीचे पार्श्वसंगीतही लक्षात राहण्याजोगे होते. त्यांच्या दिग्दर्शनकलेचा उच्चांक म्हणजे बेडरूममध्ये जोनाथन चुकून रोझालीचा खून करतो तो प्रवेश. बेडरूमचा सेट गॉझ पडद्यापाठी उभारलेला होता. त्या पारदर्शक पडद्यातून दिसणाऱ्या दृश्याची प्रकाशयोजना प्रभावी होती. कपाटातून मंचकावर कोसळणाऱ्या प्रेताची भूमिका एका निनावी नटानेच 'वठविली' होती ! मंचकावर रोझाली आणि जोनाथन यांची झटापट चालू असताना हे कपाटात टांगून ठेवलेले प्रेत मंचकावर कोसळले तेव्हा अंगावर शहारे आले— 'ब्लॅक कॉमेडी'ची प्रचीती पूर्ण झाली !

## दुबे यांचे 'शुतुरमुर्ग'

एप्रिलात थिएटर युनिटने ग्यानदेव अग्निहोत्री या नवोदित नाटककाराचे 'शुतुरमुर्ग' हे नाटक सादर केले. दिग्दर्शक सत्यदेव दुबे.



ग्रांदिपच्या भूमिकेत डेरेक बॉन्ड

शुतुरमुर्ग म्हणजे शहामृग. वाळूत डोके खुपसून राहणारा हा पक्षी नाटककाराने जनहिताबद्दल पूर्णपणे बेफिकीर असलेल्या एका राजाच्या आत्मसंतुष्ट मनोवृत्तीचे प्रतीक म्हणून डोळ्यांपुढे ठेवलेला आहे. शुतुरनगरीचा हा राजा आपले अवघे लक्ष नगरीत शहामृग पक्ष्याच्या एक प्रचंड सोनेरी पुतळा उभारण्याच्या निरर्थक कामावर केंद्रित करीत असतो. आल्बेर काम्युसच्या 'कॅलिग्यूला' नाटकातील राजा ज्याप्रमाणे चंद्रावर जाण्यासाठी म्हणून एक मनोरा बांधण्यात गढून गेलेला असतो त्यातलाच हा एक प्रकार, फरक एवढाच की कॅलिग्यूला हा खराखुरा हुकूमशहा असल्यामुळे मनोरा खरोखरीच बांधला जात असतो; उलट हा शुतुरनगरीचा तकलादू हुकूमशहा असल्यामुळे त्याच्या अपरोक्ष त्याचे मंत्री शहामृगाच्या पुतळ्यासाठी लागणारा पैसाच तेवढा सरकारी तिजोरीतून काढून आपल्या खिशात घालीत असतात !

अग्निहोत्री यांचे नाटक हे आजच्या भारताच्या राजकारणावर प्रकाशझोत टाकणारा एक प्रच्छन्न उपहास आहे. शहामृगाचा पुतळा म्हणजे पंचवार्षिक योजना— ती कागदावरच राहायची ! राजाचे मंत्री हे आजकालच्या मंत्र्यांची आठवण करून देतात. जन-









अनुक्रमणिका

तेचा एक पुढारी निमूटपणे मंत्रीपदाचे जोखड पत्करतो — हा नमुनाही आजच्या आपल्या परिचितांपैकीच.

नाटकातील संवाद उपहासाची धार सारखी तीव्र करतील असेच आहेत. हा उपहास पुढे वटवटीत होतो आणि नाटक वृत्तपत्रीय पातळीवर उतरते ते दिग्दर्शक दुबे यांच्या मखलाशी-मुळे. राजाचे प्रमुख मंत्री अखेरीस त्याच्यावरच उलटतात आणि मुखवटे धारण करून त्याला कोंडीत पकडतात. दुबे यांनी या प्रसंगी माओ, स्टॅलिन, सी. आय्. ए. (अमेरिकन गुप्तहेर संघटना) आणि विल्सन यांची चित्रे वापरली होती. ही चित्रे वाईट काढलेली होती हे तर सोडाच, पण त्यांच्यामुळे नाटकाचा सारा आशय क्षणार्धात सीमित झाला, अन् त्यातील औपहासिक सत्याची व्यापकता संपुष्टात आली.

दुबे यांनी स्वतःच्या अखत्यारीत नाटकाचा शेवट बदलला तोही समाधानकारक नव्हता. सूत्रधाराच्या दुहेरी भूमिकेत राजा उपसंहारात्मक भाषण करीत असतानाच प्रेक्षागृहातून एकजण धावत येतो व राजावर पिस्तुल झाडून त्याचा वध करतो ! हा मामला निष्कारण सनसनाटी परिणामासाठी योजलेला वाटला. दिग्दर्शकाला मूळ नाट्यवस्तू समजलेलीच नाही असा निष्कर्ष जर त्यावरून कोणी काढला असता तर त्याची चूक झाली नसती.

राजाचे मंत्री त्याला घेरतात आणि हुकूमशाहीच्या रहाट-गाडग्याला आणखी एकदा गती मिळते. हा नाटकाचा शेवटही समाधानकारक वाटत नाही. स्वतः नाटककारानेच रंगविलेले राजाचे पात्र मनोविश्लेषणाच्या कठीणतर निकषांना उतरेल असे आहे. अशा परिस्थितीत नाट्यवस्तूचा परिपोष पूर्णत्वाला न्यायचा म्हणजे सत्ताभ्रष्ट झाल्यावर राजाचे काय झाले याचे चित्रण करायचे. हा पर्याय पटण्याजोगा नसेल तर निदान नाटकाच्या कथानकाची व्याप्ती वाढवायला हवी होती; म्हणजे नाट्यवस्तू जास्त सकस झाली असती. 'शुतुरमुर्ग'चा पहिला सर्व भाग जितका प्रभावी वाटतो तितका त्याचा अखेरचा भाग वाटत नाही आणि अखेरीस एका शोकात्मिकेचा प्रयत्न नाही हे निश्चित् ! अर्थात् नवोदित नाटककाराने प्रचलित राजकारणाच्या आधारे मूलगामी आशयाचा उपहास निर्माण करावा हेही नसे थोडके मराठीत या विषयाकडे आपले चांगलेच दुर्लक्ष झालेले अ अग्निहोत्रींच्या संवादात वेळोवेळी दिसणारा खोचकपणाही मर नाट्यविनोदाला नवे काही शिकवील असाच आहे.

दुबे यांचा प्रयोग त्यांच्या कीर्तीला साजेसा असा परीटघडी झाला. माधव संधानी (भाषणमंत्री) आणि अनिल झवेरी (रा मंत्री) हे नट नवखे असूनही सफाईने रंगमंचावर वावरले, हरि आत्मा (विरोधीलाल — प्रथम राजाविरुद्ध उभा ठाकले परंतु नंतर मुकाटपणे मंत्रीपदाचे जोखड पत्करणारा संधिस पुढारी), सावन (मामूलीराम— गरीब जनतेचा एक प्रतिनिध आणि मुश्ताक मर्चंट (भूखा आदमी — एक भूकवळी) आपापल्या भूमिकांना साजेशा अशा चेहेरेपट्टीमुळे प्रभावी वाट

'शुतुरमुर्ग' मधील राणीचे पात्र अभ्यसनीय आहे. प्रखर वा वापासून दूर अशी आपल्याच कोशात वाढलेली, राजाने ह केल्यामुळे खुळचट बनलेली अशी ही राणी आहे. या भूमिकेस दुबे यांनी लोरेन लोबो या हिंदी मातृभाषा नसलेल्या ख्रिश अभिनेत्रीची योजना केलेली होती. स्वतः दुबे हे राजाच्या भूमि अनुभवनिष्ठ आत्मविश्वासाने वावरले, अन् कुमारी लोबो य आपल्या उपहासप्रधान भूमिकेचे अनेक वारकावे दाखवून त्य चांगली साथ दिली. त्यांचे हिंदी उच्चारही सच्चे होते.

नाटकाला नेपथ्य जवळजवळ काहीच नव्हते, असे असू त्याचा प्रयोग मनाची पकड घेणारा झाला याचे कारण त्या नाट्य वस्तूचा ताजेपणा आणि सर्व नटांचा चोख अभिनय. सत्य दुबे हे सातत्याने रंगमंचावर विचारप्रवर्तक नाटके आणीत असत नट आणि दिग्दर्शक या दोन्ही नात्यांनी झालेली अल्काझींच या सत्शिष्याची प्रगती त्यांच्या स्वतःच्याच कर्तबगारीची निदश आहे. अल्काझींनी फक्त बीज रोवले; खतपाणी अन् मशा अल्काझी मुंबई सोडून दिल्ली स्थायिक होण्यासाठी गेल्यावर यांनाच करावी लागली !

●●

---

( पृष्ठ १० वरून....याद....पुढे चालू )

चालवलं. म्हणाला तुझी काय मुसीबत आहे ती सांग. मी आता दूर करतो. हा अनोळखी. मी ह्याला माझी मुसीबत काय सांगणार आणि हा तरी ती कशी दूर करणार ? तरीदेखील त्याच्या आग्रहा-खातीर मला आलेली तार मी त्याला दाखवली. माझ्यावर गुदरलेला प्रसंग त्याला सविस्तर सांगितला. आणि त्याने कुडता वर करून कमरेला बांधलेला एक कसा काढला. नि माझ्या स्वाधीन केला. मनगटापर्यंत हात बुडून जाईल इतक्या आणि नव्या कोऱ्या अश्रफींनी भरलेला तो कसा पाहून मी गारच झालो. त्याच्याकडे आ वासून पहात राहिलो. मला वाटू लागलं हा कोणी फरिश्ता तर नाही. मला म्हणाला, "भैय्या, लो ये सब तुम्हाराही है. ये सब मेरी आजकी और पहली आमदनी है. मैं तबला बजाता हूँ. मेरे उस्तादके यहाँ लखनौके नवाब पधारे थे. उन्होने मे तबला सुना और खुश होकर मुझे हजार अश्रफिया नजर कर मैंने वो सब मेरे उस्तादको नजर किया. बादमें उस्ताद सर गये और ये पांचसो उन्होने मेरे हासील कर दी." मी म्हणाल "आपके घरवाले क्या कहेंगे. उनकी तो सलाह लेनी होगी."

"आप बेफ़िक्र रहिये. मुझे मना करनेवाला कोई नहीं. अ तो अब खुश हो या नहीं ? चलिये तो हम थोडीसी सारंगी सुन लेंगे

आणि तिथल्याच एका कट्टयावर बसून मी दिलखुल सारंगी वाजवली.

दरोगासाहब, तेव्हापासून ते कालपर्यंत आम्ही जिगर दो होतो.

☆

त्यानंतर वाजिदसुद्धा माझ्याकडे येऊ लागला. ही दोन्ही मुलं मला माँ म्हणत. एकदा मला अजमीरहून एका कार्यक्रमाचा बुलावा आला. साजसाजिंद्यांसह गाडीभाडं आणि बिदागीसुद्धा भरपूर. मी अन्वर नि वाजिदला बरोबर घेतलं. जिनतबाई नावाची माझी एक दूरची रिश्तेदार मला तिकडे भेटली. अत्यंत कजाग बाई अशी तिची ख्याती मी ऐकली होती. माझ्या कार्यक्रमानंतर खूपच मागे लागून मला तिने दुसरे दिवशी गाण्यास घरी बोलावलं. ह्या बाईला मूलबाळ नव्हतं. म्हणून अनाथाश्रमातून एका लहान मुलीला आणून तिने वाढवलं होतं. सयिदा आता चांगली मोठी झाली होती. नाकीडोळी नीटस होती. तिचे मोठे पाणीदार डोळे ती अगदी निष्पाप आणि निर्व्याज असल्याची साक्ष देत होते. मी खूप आग्रह केल्यावर तिने एक लहानशी ठुमरी म्हटली. आणि तिच्या गोड गळ्यावर नि सुरावटीवर मी निहायत खूष झाले. कोळशांच्या सान्निध्यातलं ते एक रत्न होतं. तबल्याच्या साथीला अन्वरच बसला होता. दुगणीनंतरच्या त्याच्या अफलातून लग्ग्यांनी ती मेहफिल जिंकली—आणि तिचं मनही. ते दोघेही एकमेकावर मनोमन खूष झाले आहेत ही गोष्ट माझ्या आणि वाजिदच्या एकाच वेळी ध्यानात आली. पण निक्याच्या दृष्टीनं त्या जहांबाज बाईशी तिथे बातचीत करणं मूर्खपणाचं ठरलं असतं. प्रवासात वाजिदने अन्वरची सयिदावरून छेड काढली. आणि अन्वर गालातल्या गालात हसला. त्याला गोड गुदगुल्या होत होत्या. इकडे परत आल्यावर मी एक पत्र अजमीरच्या एका ओळखीच्या बाईकरवी सयिदाला पाठवलं. सयिदाची ह्या निक्याला आनंदाने संमती होती. पण अडचण होती ती जिनतबाईची. अखेरीस नाना लटपटी करून मी तिचा निका अन्वरशीच लावून दिला. त्यानंतरची चारपाच वर्षं कशी गेली ते त्यांचं त्यांनाच समजलं नाही. फक्त लग्नानंतरच्या दुसऱ्याच वर्षी कालेखाँ वारले आणि अन्वरला खूप मोठा धक्का बसला. पण सयिदाने मोठ्या कौशल्याने त्याला त्यातून सावरून धरलं. तिचा गोड स्वभाव, वागणं, गाणं वगैरे सर्वच गुणांनी तिने सगळ्यांना आपलंसं करून घेतलं होतं. दोघांचंही एकमेकावर आत्यंतिक प्रेम होतं. अन्वर माझ्याकडे येऊन नेहमी म्हणत असे—"माँ, है कोई मेरे जैसा तक़दीरवाला? "

पण अल्लाहूतालाहूलासुद्धा कधीकधी सुखी संसारात जहर कालवून मग मजा पाहण्यात गंमत येत असावी. एक दिवस अन्वर अचानक नाहीसा झाला. मी त्याला आणि सयिदेला राहण्यासाठी एक शानदार मकान जवळच घेतलं होतं. त्या दिवशी सयिदा रडत रडतच माझ्याकडे आली. आणि तिने तो सकाळपर्यंत घरी आलाच नसल्याचं सांगितलं. मी वाजिदला पाठवून त्याचा खूप तलाश केला. हिचे डोळे रडून रडून सुजले होते. जेवलीसुद्धा नव्हती. मी तिची खूप समजूत घालून तिला माझ्याकडेच ठेवून घेतलं. तिचं मन कशातच लागत नव्हतं. माझ्या आग्रहामुळे ती पीराला नवससुद्धा बोलून आली. शेवटी एक दिवस घरी गेली. रोज वाजिद घरी जाऊन तिची खैरियत विचारून येत असे. तसाच त्याचा अन्वरचा शोधही जोरात चालू होता. दरोगासाहेब, आपल्या चोपडीत तक्रारसुद्धा नोंदवली होती पण काही उपयोग झाला नाही. लोक हळूहळू म्हणू लागले की तो कुठेतरी अपघातात सापडला असेल आणि वाचू शकला नसेल. नाहीतर आतापर्यंत नक्कीच वापीस आला असता. सयिदा मात्र कुणाच्याच सांगण्याकडे लक्ष देत नव्हती. रोज खिडकीत उभी राहून तासन् तास अन्वरच्या वाटेकडे डोळे लावून बसण्याचं तिला वेडच लागलं होतं. पाय दुखले की तानपुरा काढून स्वरामध्ये स्वतःला विसरून जाण्याचा प्रयत्न करायची. खाणंपिणं तर अजिबात सोडून दिलं होतं. बघता बघता शरीरावरचा सर्व तजेला नाहीसा झाला होता. वाजिदच्या किंवा माझ्या हट्टाने ती क्वचित कधीतरी पोटात ढकलीत असे. सयिदाच्या घराला लागूनच धंदेवाल्यांच्या मोहल्ल्याला सुरुवात होत असे. मी सयिदाला नेहमी सांगत असे की तू खिडकीत उभी राहून अन्वरची वाट पाहतेस आणि खालून पुढच्या मोहल्ल्यात जाणारे लोक तुझ्याविषयी गैरसमज करून घेतील. असंच झालं एक दिवस. कुणीतरी हिला त्या खिडकीत पाहिलं आणि तिची छेड काढली. हिचं मुळी लक्षच नव्हतं. तिची भ्रमिष्टासारखी नजर अन्वरच्या वाटेकडे लागली होती. ह्या माणसाला तिचा राग येऊन एक लहानसा खडा त्याने तिला मारला. कपाळाला लागल्यावर ही घरात आली.

वाजिद, आता पुढचं तूच सांग. मला आता बोलवत नाही.

★★

दुसरेच दिवशी सकाळी मी नेहमीप्रमाणे सयिदाभाभीकडे गेलो. घरात येतायेताच मी तिच्या कपाळावर जखम पाहिली. तिने जखमेची नीट काळजीही घेतली नव्हती. मीच मग औषध लावून पट्टी बांधली. तिने तानपुरा मिळवला आणि पिलुतली एक करुण ठुमरी आळवण्यास सुरुवात केली. . . . . . मोर सैंया बिदेसवा कलेजवामें लागे कटार. . . . . . ठुमरीच्या शब्दांनीच माझ्या हृदयात कळ आली. मी मोठ्या कष्टाने अश्रू आवरले आणि सारंगीची संगत सुरू केली. ठुमरी म्हणतानासुद्धा अन्वरच तबल्यावर ठेका धरतो आहे असा तिला भास होत असावा. कारण मी पायांनी दीपचंदीचा ठेका धरला होता आणि ती न चुकता समेवर येत होती. गातागाता मधूनच तिचा चेहरा आनंदाने मोहरून यायचा पण लगेच नेहमीच्या दुःखाचं सावट तिचा चेहरा झाकून टाकायचं.

मी भान हरपून सारंगीवर गज ओढत होतो. माझी बोटं

कै. गोपाळकृष्ण भोबे स्मारक निधी समितीकडे आलेल्या देणग्याची संपूर्ण यादी हा अंक प्रसिद्ध होईपर्यंत संपूर्ण तयार झाली नसल्याने त्या संबंधीची सर्व माहिती येत्या अंकात प्रसिध्द केली जाईल. महाराष्ट्र आणि प्रामुख्याने गोवा येथून ज्यांनी-ज्यांनी या कार्यास हातभार लावला त्यांची समिती ऋणी आहे.








नकळत फिरत होती. ते वाजवणं वेसूर होत नव्हतं. आम्ही दोघंही पिलू रागात एकरूप होत होतो. अंतऱ्याकडे जाताना तिने एक वरच्या सप्तकात गिरक्या घेत फिरणारी तान मारली. आणि ती मुष्कील फिरत माझ्या हातातून निघू शकली नाही. मी म्हणालो, "मुआफ करना भाभी, फिरसे" .......माझ्या विनंतीला मान देऊन तिनं पुन: एकदा ती तान घेतली.....पण...पण ती पुरीच होऊ शकली नाही. मध्येच तानपुऱ्याची तार तुटली. तिचं एक बोट तारेत अडकलं आणि तिची मान खाली लवंडली. गाता गाता तिनं देह ठेवून दिला होता. अन्वरची वाट पाहून पाहून ती थकली होती. कदाचित् तो तिथेही भेटेल असं तिला वाटलं असावं. तिचे लांब, मोठे डोळे कायमचे मिटले होते. दोन्ही डोळ्यांच्या कडांमधून अखंड पाझरणारं पाणी अजूनही आटलं नव्हतं. दोन टपोरे अश्रू अजूनही हनुवटीपर्यंत पोहोचले नव्हते.

★★

काल संध्याकाळी मी कपडे करून मांकडे यायला निघालो होतो. इतक्यात दरवाजावर थाप पडली. दरवाजा उघडला आणि मी चाटच झालो. अन्वर आला होता. मी त्याला आवेगानं मिठी मारली. आल्याआल्याच तो विचारू लागला, "वाजिद, सयिदा कहाँ है? घरपे ताला क्यूं लगा रख्खा है?"...मी क्षणभर आवाक् झालो. माझे पाय लटपटू लागले. पण मोठ्या संयमाने त्याला आवरून धरलं. त्याला खाली तक्क्याशी बसवला. त्याला गरम चहा पाजला आणि इतकी वर्षं तो कुठे गायब झाला होता हेच त्याला पुन: पुन: विचारत राहिलो. शेवटी त्याने मला त्याची सर्व हकीकत सांगितली. एका अखबारात ह्याने मियाँ शलारीखाँसाहेबांच्या तबल्याची जाहिरात वाचली. कार्यक्रम जवळच होता. ही स्वारी तडक तेथे गेली. मियाँच्या तबल्याने ह्याला वेड लावलं. तेथेच त्याने खाँसाहेबांना गळ घातली स्वत:ला शागीर्द बनवून घ्यायची. खाँसाहेबांनी हाँ म्हणताच स्वारी बिलासपूरला. घरी कळवणं वगैरे काहीच नाही. नंतर मला सांगू लागला, "वाजिद, क्या कहूँ—अब मुझे इतना तबला याद हुआ है की जिनको मैं तैय्यार करूँगा वो सब उस्ताद बन जायेंगे" पण त्याचा हा आनंद क्षणिकच होता. हे सर्व सयिदेला कधी सांग[...] असं त्याला झालं होतं.

अखेरीस अल्लाहूतालाहने ते दुष्कृत्य माझ्याकडून पार पाड[...] मला सयिदाची सर्व हकीकत त्याला सांगावी लागली. ऐक[...] ऐकता त्याचे डोळे तांबडेच होत चालले होते. कपाळावरची न[...] अन् नस तटतटू लागली होती....पण अश्रूंचा बिंदूही ठिवक[...] नव्हता. ह्यांचा सर्व साठा बहुतेक सयिदानेच खलास केला होत[...] शेवटी वैतागून तो आपल्या कपाळावर नि छातीवर जोरजोरा[...] मुठी आपटून घेऊ लागला. मी त्याला आवरण्याचा खूप प्रयत[...] केला पण तो काही केल्या थांबेना. सारखा......"सयिदा. सयिदा मुझे माफ करना.....मैं आ रहा हूँ..." असं ओर[...] लागला.

मी चटकन् कपाटातून व्हिस्कीची बाटली काढली आणि[...] एका मोठ्या ग्लासात पाणी ओतून ती त्याला बळजबरीने पाजल[...] पहिल्या दोन घोटांतच तो थोडा नरम झाला. मग आम्ही दो[...] एकेक आठवणी सांगत खूप बोलत राहिलो—पीत राहिलो. मधूनच[...] तो मियाँ शलारीखाँसाहेबांच्या गती म्हणून दाखवत होता. मधूनच[...] सयिदाबद्दल बडबडत होता. "वाजिद, तूही तक़दीरवाला है. [...] सयिदासे मेरेसेही ज्यादह मर्तबा मिल चूका है." सकाळी साडेती[...] चारला आम्हांला झोप लागली. तो सज्जातच झोपला. मी आत[...] येऊन पडलो.

★★

अन्वर गेल्यानंतरचा आजचा पाचवा दिवस. सारंगी विकून आणलेल्या बाटल्यांतली शेवटची बाटली उरलीय. चेहऱ्यावर रा[...] दाढीचं जंगल माजलंय. कालपरवा उत्साहाने मियाँ शलारीखाँसाहेबांच्या गती म्हणून दाखवणारा राजबिंडा जवान....त्याच्यावर जीवापाड प्रेम करणारी सयिदाभाभी....दार केव्हाचं वाजतंय. पाच रात्रींच्या सतत जागरणामुळे डोळ्यांची आग आग होतेय. अंग मोडून आलंय. कणकणल्यासारखं वाटतंय. सैल झालेली तेहमत घट्ट करीत मी अंथरुणावर पडतोय. मला अन्वरमियाँची याद येतेय.......सयिदाभाभीची याद येतेय....!

●●●



[ पृष्ठ ७० वरून ]

यामुळे संघर्ष व गुंतागुंत वाढली असती. संघर्षाचा विकास अधिक वास्तव झाला असता व कृत्रिमता आली नसती.

एखाद्या व्यक्तीची रंगभूमीवर होणारी प्रगती सांगणे अतिशय कठीण आहे. त्यात निवेदनाचाच भाग खूप येतो. रेखाच्या व्यक्तिरेखेची वाटचाल त्यामुळे थोडी मर्यादित झाली आहे.

वास्तव जीवन रेखाटण्याच्या हव्यासात आजची मराठी कादंबरी आहे. संयम, सूचकता यापेक्षा आहे तसे, त्यात निवडीचाही फारसा निकष न लावता, कादंबरीत सांगण्याचे प्रयत्न सुरू आहेत. या पार्श्वभूमीवर लेखकाचा संयम जाणवतो. रेखाचा संबंध आलेल्या नाटयकलेच्या प्रांगणात पतित जीवन चित्रित करण्याची संधी असूनही, हा भाग लेखकाने मोठ्या सूचकतेने व संयमाने सांगितला आहे.

कादंबरीचे शीर्षक आणि वेष्टनही कमालीचे बोलके असून वाचकाचे मनोरंजन करण्याचे व त्याला विरंगुळा देण्याचे सामर्थ्य या कादंबरीत निश्चित आहे.

—प्रा. वि. द. संत

**लक्ष्मणरेषा :** वि. वा. पत्की; मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, मूल्य रु. ४.

●●●






# दुधा-साखरेचा योग-लता




**"लता** मंगेशकर"सारखाविषय—त्यांच्याशी हार्दिक जिव्हाळ्याने बांधलेल्या लुब्ध रसिकांची हृद्य निवेदने—पद्मा सहस्रबुद्धे यांनी जीव ओतून केलेली सजावट—उत्कृष्ट मुद्रणाचा आदर्श वनविण्याच्या ईर्षेनेच जणू काय मौजकारांनी केलेली छपाई—यातील एकेकच गोष्ट एकाद्या ग्रंथाचे भाग्य ठरावी. मग या चारांचा एकत्र झालेला संयोग—!

लता मंगेशकर रौप्य महोत्सव स्मारक-ग्रंथ समितीने प्रकाशित केलेला 'लता' हा ग्रंथ म्हणजे मराठी साहित्याचे एक अतिशय सुबक आणि लोभसवाणे लेणे आहे. लताबाई या भारतभूषण आहेत. परतत्त्वाचा स्पर्श झालेल्या त्यांच्या एकाद्या तरी सुराने ज्याला आपल्या आयुष्यातील सुखदुःखाचा एक क्षणभर तरी विसर पडलेला नाही असा एकही भारतीय असणे अशक्य आहे. ईश्वराचे स्वरूप आनंदमय आहे असे म्हणतात. लताच्या स्वरसंगीताच्या पंखावर आरूढ होऊन भारताच्या कोना-कोपऱ्यात भरून दशांगुळे उरणारा आनंद आर्तांच्या दुःखा-कष्टावर फुंकर घालीत फिरताना पाहिला की ईश्वरी आनंदमयतेचीच जाणीव होते. लताविषयीच्या प्रीतीचे साम्राज्य आज इतक्या हृदयांवर चालत आहे की या साम्राज्यावर सूर्य मावळत नाही असे म्हटले तर ती अतिशयोक्ती होणार नाही.

गायिका म्हणून जिचे अधिराज्य आपण मानतो ती लता आहे तरी कशी हे जाणण्याची ओढ तिच्या असंख्य भक्तांना लागलेली असते. लताविषयी तुरळक इकडे तिकडे प्रसिद्ध होणाऱ्या लेखांनी या ओढीचे समाधान होत नाही. ते समाधान आकंठ तृप्ती होईतो करण्याचे सामर्थ्य या 'लता' ग्रंथामधे आहे. या ग्रंथातील लताचे व्यक्तिचित्र चितारण्यात अगदी वि. स. खांडेकरांपासून तो लताचा ड्रायव्हर जयसिंग आबदार इथपर्यंत साऱ्यांनी हातभार लावलेला आहे. आपण लेखक आहोत असा भ्रम स्वाप्नातसुद्धा ज्यांना होणार नाही अशाही कितीतरी व्यक्तींनी लिहिलेल्या आठवणी त्यातील जिवंत जिव्हाळ्यामुळे अगदी स्मृति-चित्रांसारख्या मनोगम्य झालेल्या आहेत. लक्षावधी लताभक्तांना इथे तिचे अनेकांगी दर्शन घडते.

कुठे ती एकाद्या रिबिनीसाठी अथवा सेफ्टीपिनसाठी वहिणीशी मारामारी करताना दिसते. तर कुठे आईची नजर चुकवून तेल, तिखट आणि मीठ कालवून चोरून खाताना दिसते. कुठे भेटीला आलेले आपटे घसरून पडले तर खिदळताना दिसते तर कुठे मूठभर देह असताना हातभर तंबोऱ्याजवळ वसून सारी भावंडे निजली असतानाच संगीत साधना करताना दिसते. कुठे आपण कामावर न गेलो तर लहान भावंडे काय खातील म्हणून अंगात ताप असताना उपाशी पोटी दोन मैल चालून थकव्याने बेशुद्ध पडताना दिसते तर कुठे आईला कष्ट पडू नयेत म्हणून स्वतः स्वयंपाक करताना दिसते. कुठे रस्त्यावर पडलेली बेवारशी कुत्री भूतदयेने घरी आणून तिच्या पिल्लांना गादी, पाळणा असे सोपस्कार करताना दिसते तर कुठे खांडेकर ऑपरेशनसाठी मुंबईत आले की त्यांना विश्रान्तीसाठी आपल्या घरी नेऊन त्यांची सेवा करताना दिसते. कुठे फाटकी छत्री घेऊन मुंबईच्या पावसाशी संग्राम करताना दिसते तर कुठे शिवाजीचे कार्य आहे असे म्हणताच मूठभर नोटा उधळताना दिसते. कुठे जिवाची मैत्रीण आली की आपल्या हाताने चहा आणून देताना दिसते तर कुठे . . . . .

किती आणि किती दर्शने !

लता वृंदावनाला गेली. तिथे श्रीकृष्णाची मूर्ती पहाताच मुक्त कंठाने रडू लागली. एकीकडे ही भक्तीची ओढ. त्याच वृंदावनात जिथे लताचे पाऊल पडले होते तेथील माती उचलून वृंदावनीच्या साधूंनी आपल्या कपाळी लावली. हीही भक्तीचीच ओढ. असे किती तरी प्रसंग. हा ग्रंथ वाचताना मला सारखी सारखी आठवण येत होती. लाडक्या विठूचा कौतुकाने आनंद गजर करीत कल्लोळत चाललेल्या दिंडीतील वारकऱ्यांची. ज्यांना परस्परांशी संबंध आहेच असे नाही अशा अनेक क्षेत्रांतील अनेक लहानथोर माणसे या दिंडीत आपपर भाव विसरून एकत्र झालेली आहेत आणि लताचे गुणगान गाण्यात तल्लीन झालेली आहेत.

आणि अतिशय मोलाची गोष्ट अशी की या साऱ्या लतालुब्धांना लतेविषयी जे प्रेम वाटत आहे ते विठ्ठलाच्या भक्तांना विठ्ठलाविषयी वाटणाऱ्या प्रेमासारखेच अंतरीचे आहे. अकृत्रिम आहे. इथे व्यवहार नाही. देवघेव नाही. ही नितान्त आत्मीयता आहे. भक्ती आहे.

दीनानाथांच्या मृत्यूच्या वेळी लता बारा वर्षांची होती. त्या वयात अनाथ झालेली आई आणि भावंडे यांना तिने सांगितले, 'भिऊ नका, मी आहे.' प्रसंगी सारेच सांगतात तसे हे सांगणे औपचारिक नव्हते. भारतीय युद्धात अर्जुनाला 'भिऊ नको. मी आहे' असे सांगणाऱ्या श्रीकृष्णाच्या शब्दासारखे हे सांगणे होते. निष्ठेचे जे ईश्वरी अधिष्ठान पुढील जीवनात तोल सांभाळून धरणार होते तेच हे अधिष्ठान या वेळी कदाचित अजाणपणे







अनुक्रमणिका

बोलत होते. श्रीकृष्णाच्या मुखातून जो "मी" बोलत असतो तोच "मी" साऱ्यांच्या मुखांतून बोलतो. प्रश्न असतो तो या "मी" ची ओळख पटवून घेऊन अविचल निष्ठेने कर्मरत रहाण्याचा. व्यक्ती-पासून व्यक्ती वेगळी होते ती इथे.

लता लोकांना आवडते ती तिच्या गाण्यामुळे. या आवडीची आंधळी भक्ती होणे दुष्कर नाही. पण लताच्या भक्तांचा जो मोठा गणसंघ आहे त्यात सारेच भक्त आंधळे नाहीत. डोळस भक्तीही लतावर जडावी यासाठी तिच्यात तसे काहीतरी अधिष्ठान असावयास हवे. स्वत:तील या अधिष्ठानाचा शोध लता घेत असावी तसाच तो शोध तिचे भक्तही घेत असावे. या अधिष्ठानानेच लतेचा तोल सावरलेला आहे. जगदंबेची कृपा, ज्ञानेश्वरांची लेखणी, समर्थांचे वैराग्य, शिवाजी महाराजांची तरवार आणि या साऱ्यांनी पवित्र झालेला मंगल महाराष्ट्र यांच्याशी या अधिष्ठानाचे नाते आहे. रसिकांच्या विराट विश्वाची सम्राज्ञी असलेली ही लता आपणाला शिवाजीची दासी मानते, नुसते मानते नाही– होऊ पहाते. होते. हा तिच्या मोठेपणाचा आगळेपणा आहे. तिच्या वरील डोळस भक्तीची प्रेरणा तिच्या ठायी जे अंगभूत असे उदात्तत्व आहे त्याच्याशी संबंधित आहे. हे उदात्तत्व नसेल तर जे जे मंगल, जे जे शिव त्याचे दास्य कुणाला झेपावयाचे नाही.

'लता' या ग्रंथात चोरून तिखटमीठ खाणाऱ्या लताचे हृद्य दर्शन जसे होते तसे अलौकिकाचा छंद घेणाऱ्या लताचे मनोज्ञ दर्शनही होते. त्यामुळे हा ग्रंथ लतालीला-मृत न होता एक भावरम्य स्मृतिग्रंथ होतो. लता थोर आहे याचा कधीही विसर पडू न देता पुन्हा ती तुमच्या आमच्या सारखी माणूस आहे याचीही जाण सदैव रहाते. ग्रंथाच्या सौंदर्याची अवीटता याच्यात आहे. लताच्या भगिनी उषा मंगेशकर यांनी काढलेल्या लता आणि दीनानाथ यांच्या रंगित चित्रांनी ग्रंथ सजलेला आहे. अनेकविध स्वरूपांत लताचे दर्शन घडविणाऱ्या फोटोंनीही सौंदर्यात भरच पडलेली आहे. लताच्या संबंधितां-चेही फोटो ग्रंथात आहेत.

एक सूचना करावीशी वाटते. ग्रंथाची अकरा रुपये ही किंमत आहे त्या स्वरूपात मुळीच जास्त नाही. परंतु लताचे असंख्य चहाते असे असतील की त्यांना ही किंमत देणे परवडणार नाही. ग्रंथात जे मुद्रण वैभव आहे त्याचे हे चहाते भुकेलेले नाहीत. ते भावाचे भुकेलेले आहेत. त्यांच्यासाठी या पुस्तकाची स्वस्त आवृत्ती निघू शकेल का? लताच्या या राजस पूजेचे दर्शन जे भाग्यवान आहेत त्यांनी घेतले. जे दारा-बाहेर थबकले आहेत त्यांनाही आता शक्यतर हे दर्शन घडू द्या. पद्मावाईंची सुंदर सजावट, आर्ट पेपरवरील असंख्य फोटो, मौजेची राजशाही छपाई हे राज-वैभव क्षणभर दूर ठेवले आणि जे काही लेख केवळ प्रतिष्ठेच्या उपचारासाठी घेतलेले उघड उघड दिसतात ते गाळून लताचे नातेवाईक आणि तिच्या जिव्हाळ्याने जडलेले तिचे संबंधी यांचे भावरम्य लेख ठेवून नुसती भावभक्तीच पत्रपुष्पांची पूजा बांधली तरी त्या दर्शन नेही दाराबाहेरचे ते बापुडे भक्त धन्य मानतील. तेही लताचेच भक्त आहेत विसरणे बरे नव्हे.

—आनंद साध

(**लता** : प्रकाशक–लता मंगेशकर रौप महोत्सव गौरव ग्रंथ समिती; पृष्ठे २०४+३० पृष्ठे फोटो; मूल्य रु. ११

## मोबे–एक माणूस

'राधाबाई' नाटकाच्या तालमी सुरू होत्या. त्या निमित्तानं मी मॅजेस्टिक सिनेमा समोरच्या नाट्यनिकेतनच्या हॉलमध्ये जात असे. खेडवळ माणूस. मनगटावर घड्याळ बांधलेलं असलं, तरी त्याचा उपयोग करावा, असं बंधन नसे. एकदा तालमीच्या वेळे पूर्वी चांगला अर्धापाऊण तास मी हॉलवर जाऊन दाखल झालो.

तो शेजारचं दार उघडून एक भला माणूस बाहेर आला. नवल असं की त्याच्य मुद्रेवर त्यानं कसलंही कवच वा मुखवटा चढवलेला नव्हता. एक आपला साधा सरळ अव्यंग 'माणूस'! हसून मजकडे पाहात तो म्हणाला,

"मी भोबे. काय घेता? चहा की कॉफी?"

आता असा आपला परिचय करून देऊन लगेच काय घेतो त्याची चौकशी करण सभ्याचाराच्या तंत्रात बसत नव्हतं. पण भोबे हा माणूस 'सभ्य' नव्हता. तो नुसताच 'माणूस' होता, म्हणून हा अधिक आगळेपणा करू शकला–"काय घेता? चहा की कॉफी?

हा असा निर्मळ माणूस पहिल्या क्षणीच मला आवडला. तो चित्रकार आहे संगीतातला उत्तम जाणकार आहे, उत्तम रसाळ लेखन तो लिहू शकतो, हे मल काहीच ठाऊक नव्हतं, तरी देखील तो आवडला.

नंतर लक्षात आलं, की एखाद्या लहान मुलासारखी भोब्यांना आपलं ते खरं असा हट्ट धरायची संवय आहे. 'भोबेही हट्टी, मीही. भोब्यांचंही पाठांतर दांडग मलाही माझ्या पाठांतराचा अभिमान.' एकदा एका पाठावरून वाद निघाला. दोघेहं हट्टास पेटलो. शेवटी दोघेही तो ग्रंथ शोधीत वणावणा हिंडलो. शेवटी ग्रंथ सापडल मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या केन्द्रशाखेत. बरोबर पाठ कुणाचा होता ते नीट स्मरत नाही. बहुधा भोब्यांचाच असावा.

हट्टी म्हणजे किती? एकदा भोब्यांनी मला वाटेतच पकडलं. म्हणाले, चल तुमचं स्केच काढतो. खरोखरी मला वेळ नव्हता. अगदी निरुपाय होऊन मी त्यांच्य घरी खुर्चीवर बसलो. भोब्यांची पेन्सिल भराभरा काम करू लागली. ते इतके तन्म झाले, की मुलीनं वहिनींचा काही निरोप सांगितला तोही कानावरची मासकी उडवाव तसा त्यांनी उडवून दिला.

स्केच पुरतं झालं. भोबे माझ्या मुद्रेकडे अन् स्केचकडे–असं निरखून निरखू पाहू लागले. इतकं की मला हंसू आलं. ते भोब्यांना कळलं. थोडे रागेजून ते म्हणाले "हसता काय असे? तुलना करून पाहायला नको?"

खरोखरी स्केच चांगलं झालं होतं. माझ्या घरी ते नीट जपून कुठं लावी म्हटलं, तर तशी जागाही नव्हती, अन् आपल्याच घरी आपलंच स्केच कसं लावायचं तेव्हा मग मी ते माझ्या धाकट्या भावाला देऊन टाकलं.

पुढं मुंबईस गेल्यावर भेटता क्षणी भोब्यांचा पहिला प्रश्न–स्केच कुठं आहे









मी सांगितलं, की ते भावाला दिलं. त्यानंतर भोब्यांनी जो चेहेरा केला, तोच मुळी स्केच काढण्याजोगा होता. आता हे एवढं नुकसान झाल्यावर जगाचं होणार तरी कसं, असा भाव त्या सच्च्या माणसाच्या मुद्रेवर तरळून गेला.

एका नभोनाटयात भोब्यांनी एका संगीत शिक्षकाची विनोदी भूमिका केली. इतकी चांगली की सांगता पुरवत नाही. ती ऐकताना मी अगदी गडबडा लोळू लागलो. लगेच मुंबई रेडियोकडे चौकशी केली. भोब्यांचं नाव कळलं. भोबे भेटताच मी त्यांचा हात गदगदा हालवीत त्यांचं मनःपूर्वक अभिनंदन केलं.

अभिनंदन काय केलं. गवताच्या गंजीवर पेटती काडीच टाकली मी! भोब्यांनी माझा हात धरला, अन् एका हॉटेलमध्ये घेऊन गेले. हे इयपर्यंत त्यांचं माझं दुमत नव्हतं. पण त्यानंतर जवळजवळ तासादीडतासानं आम्ही हॉटेलमधून बाहेर पडलो, त्या वेळी भोबे चिडलेले, अन् मी जांभया देत असलेला!

त्याला मी तरी काय करणार! तसा मी प्रल्हाद कुळातलाच म्हणायचा–असुर कुळातला. सूर चांगला स्वच्छ दाणेदार लागला असला, तर बरं वाटतं. या पलिकडे काही गती नाही. अन् भोबे मला आरोह, अवरोह, वर्ज्य, ताल, मूर्छना–हे सगळे भेद सप्रयोग समजावीत बसले! त्यांनी दाखवलेली मूर्छना ऐकून मला मूर्छा आली नाही, हे भाग्य–भोब्यांचं!

बाहेर पडल्यावर भोबे पुटपुटले, चांगला कामाचा तास दीड तास फुकट गेला! ते पुटपुटणं ऐकायला येऊनसुद्धा मी उत्तर दिलं नाही. अव्यापारेषु व्यापार करणाऱ्या माणसाला भली शिक्षा झाली.

शेवटचे भोबे मला स्मरतात ते लताबाईंच्या निमित्तानं झालेल्या संगीत महोत्सवाचे वेळी भेटलेले. अब्दुल हलीम जाफरखाँनं सतारीवर त्या दिवशी लताङगी असा वाजवला–असा वाजवला ! मी शेजारी बसून पाहात होतो, अहा अहा म्हणता म्हणता भोब्यांच्या तोंडी फेस यायला झाला. ते वादन संपल्यावर आम्ही दोघे भेटलो कॉफीच्या स्टॉलजवळ. भोबे इतके संतुष्ट झाले होते, की जणू काय सतार त्यांनीच वाजवली होती. ते दिवशी हॉटेलमध्ये त्यांना झालेला पश्चात्ताप विसरून जाऊन पुनः हा वेडा माणूस वादनातल्या मोक्याच्या जागा मला समजावून देऊ लागला.

आता पुनः असे कार्यक्रम होतील. पुनः कोणी सतार वाजवील. मी खुळ्यासारखा ऐकत राहीन. मात्र ते वेळी भोबेंची खुर्ची रिकामी असणार!

भोबेंचं मरण आइकलं, अन् असं वाटून गेलं, की आईच्या दुधाएवढ्या निष्पाप मनाचा एक दोस्त भरल्या पंगतीतून उठून गेला आहे!

–गो. नी. दांडेकर

## बेला : बारा कथांची बोरमाळ

**मराठी** कथेच्या प्रांतात प्रा. वामनराव चोरघडे यांनी स्वतंत्र व अढळ असे स्थान निर्माण केलेले आहे. 'बेला' या कथासंग्रहात त्यांच्या गेल्या दोन वर्षांत लिहिलेल्या बारा कथांचा समावेश केलेला आहे. प्रा. वामनराव चोरघडे यांच्या कथेची सर्व वैशिष्टचे या संग्रहातही आढळतात.

कथासंग्रह वाचल्यावर अनेक व्यक्ती डोळ्यासमोर उभ्या राहतात. वामनरावांच्या समर्थ लेखणीतून उतरलेल्या या प्रत्येक व्यक्तीला स्वतंत्र आणि देखणे व्यक्तिमत्व आहे. 'बेला', 'बडचाची आई,' 'सौ. सरस्वती पानसे', 'अंतू पितळे', 'विनायक मुळे,' 'काशिनाथ,' 'बापजी' इत्यादि अनेक पात्रांच्या स्वभावाचे कंगोरे विविध प्रसंगांच्या गुंफणीतून प्रा. चोरघडे यांनी साकार केलेले आहेत.

'सल' ही कथा त्यातील अनुभवाच्या नवेपणामुळे मनावर ठसते. मित्रप्रेमावर भरवसा ठेवून सुधीरला मुक्त विश्वासाने आपल्या पत्नीशेजारी एकांतात निजावयास लावणारा काशिनाथ जितका असामान्य तितकाच सीतेचा तोल जातोय असे वाटता क्षणी 'कचकचून थोबाडात' देणारा सुधीरही असामान्य. हा अनुभवही असामान्य पण अशक्य मात्र नाही हे कबूल करावयास पाहिजे.

'कहाणी, माझी दुधाची साय' नि 'कहाणी, दीढ लागली त्या फकी काकीची' या कथा कहाणी या शीर्षकाखाली लिहिल्या आहेत. पहिली कहाणी तर लेखकाने सांगितल्याप्रमाणे 'कहाणी आहे जुन्या वेशाची पण आहे मराठी देशाची' अशीच आहे. भाषा ओघवती नि समर्थ आहे. लेखनाचा हा प्रयत्न नव्याने हाताळलेला आहे. मराठी कथेत नवे-जुने अनेक प्रयोग चालले आहेत हा प्रयोग देखील या प्रयत्नात मोडावयास हरकत नाही. दुसरी कहाणी कलादृष्टचा फारच बहारदार उतरली आहे.

या कथेतील 'बापजीं'ची व्यक्तिरेखा वाचकांच्या मनात कायमचे घर करते. कमालीची प्रसन्नता या कथेत आहे. अबोल फका काकीची करुण कहाणी वाचकाला एका धुंद वातावरणात नेते. प्रा. वामनराव चोरघडे यांच्या समर्थ ठरलेल्या कथेत या कथेला अवश्य स्थान द्यावयास हवे.

'उत्पात' या कथेत सुनेवर काममोहित होणारा 'लच्छू' व त्यामुळे त्याच्याबद्दलचा आदर दूर ठेवून खून करणारी चंदन, यामुळे तिला झालेली शिक्षा व नंतर सुटका इत्यादि थोडासा जगावेगळाच कथाभाग या कथेत आलेला आहे.

'वारकऱ्याची कथा' नि 'दिल् लगी' या दोन्ही पूर्णपणे प्रादेशिक भाषेतील कथा.

'उपसर्ग' या कथेतील 'विनायक मुळे'





अनुक्रमणिका

यांची विकृती विचित्र आहे. आणि ही विकृती नष्ट करण्याचा प्रयत्नही तितकाच विचित्र नि जगावेगळा. हा प्रश्न आहे मानसशास्त्राचा. समलिंगी संभोगातून निर्माण झालेली मानसिक विकृती हा कथेचा आगळा असा विषय आहे.

'अंतोबा, गाढव अन् कमळी' या कथेतील 'अंतू पितळे' असाच मुलखावेगळा. स्त्रियांशी बोलावयास देखील लाजणारा अंतोबा कमळीशी विवाहबद्ध होतो.

त्याच्या या बुजरेपणामुळे त्याची लग्नानंतर फजिती होते. या कथेप्रमाणे 'जोहार' ही कथा उल्लेखनीय आहे. ही कथा मनोविश्लेषणात्मक असून 'येसू' सारख्या अनाथ मुलीचे दुःख यात चितारलेले आहे.

'नाग-नागीण' मधील जहांबाज 'सरस्वती पानसे' व 'मनोवेग' मधील 'बंड्याची आई' या व्यक्तिरेखाही मनावर ठसतात.

'मनस्विनी'तील 'बेला'चे चित्रही असंच प्रभावी आणि अत्यंत समर्थ आहे. यातील वातावरणास उठाव आणण्यासाठी हिंदीचा वापरही लेखकाने केलेला आहे. प्रयोगमूल्याच्या दृष्टीने यालाही काही स्थान आहे.

या कथासंग्रहाचा एक महत्त्वाचा गुण म्हणजे प्रा. वा. कृ. चोरघडे यांची प्रभावी भाषा. कितीतरी वाक्ये मनाला चटका लावतात. त्यांचे सौंदर्य विजेसारखे लखलखते. या वाक्यांमुळे कथेला काव्यमयताही आलेली आहे. अनेक नव्या प्रतिमांचा वापर ते करतात.

या संग्रहात शेवटी प्रा. वामनराव चोरघडे यांचा श्री. मधुकर केचे यांनी परिचय करून दिलेला आहे. त्याचाही विशेष उल्लेख करणे जरूर आहे. तो अत्यंत दिलखुलास नि भावस्पर्शी आहे. त्यांच्या व्यक्तिमत्वाची नि कर्तृत्वाची नीट ओळख या परिचय लेखामुळे घडते.

**–प्रा. वि. द. संत**

**बेला** : प्रा. वामन चोरघडे; भारतीय ग्रंथ भवन, मुंबई; मूल्य रु. ५.

---

## लक्ष्मणरेषा : जीवन आणि कलावंत यांचा संघर्ष

'**लक्ष्मणरेषा**' ही वि. वा. पत्की यांची क्रमांक चारची कादंबरी. या पूर्वीच्या त्यांच्या कादंबरीने पारितोषिक मिळवल्याने लेखकाबद्दल अपेक्षा निर्माण झाल्या आहेत. कादंबरीबरोबरच लघुनिबंध, लघुकथा, प्रवासवर्णन इत्यादि साहित्यप्रकारही त्यांनी हाताळले आहेत व मराठीच्या साहित्य प्रांतात ही त्यांची साहित्यसेवा ग्रंथरूपाने नोंदली गेली आहे.

कादंबरीचे विश्व रेखा या पात्राभोवती गुंफलेले आहे. तिचे वडील, तिची आई, पती, मुले, भाऊ इत्यादींच्या सहवासाचे सारे जीवन तिला मिळालेले आहे. कौतुक करणारे, प्रेमाची पखरण घालणारे आईबाप, कालिदासासारखा सुशिक्षित व प्रेमळ पती, रेखा, विवेक यांच्यासारखी सुंदर मुले या सर्वांमुळे सामान्यपणे तिचे जीवन पूर्ण आहे. पण काही वेळा काही असामान्य गोष्टी घडतात आणि त्यामुळे जीवनात वैचारिक संघर्षास प्रारंभ होतो. रेखाच्या जीवनातही हेच घडले.

रेखाच्या अंगी वसणाऱ्या नाटचगुणांचा वयाबरोबरच विकास होतो. वाढत्या जबाबदाऱ्या संभाळून नवऱ्याच्या कौतुकाच्या पाठबळावर ती नावलौकिक मिळवते. नाव मिळवणे सोपे पण टिकवणे अवघड. त्यासाठी सातत्याने नाटकात कामे करावयास हवींत. पतीची संमती होती, तोपर्यंत ते जमतही होते. कालिदासाने नापसंती दर्शवली. त्यानंतर ते जीवन तिने संपवणे आवश्यक होते. पण रेखाचे कलाप्रेम जागे झाले. स्वतः नीलांबरीबाबत केलेले वर्तन संशयास्पद असूनही त्यांनी आपल्याच वर्तनाचा संशय घ्यावा, याचा राग येऊन ती जिद्दीने आपल्या पायावर उभी राहून कीर्ती नि पैसा मिळविते. त्यामुळे कधी माहेरी तर कधी मुंबईत हॉटेलमध्ये तिला राहावे लागते. कलाप्रेम की संसार या संघर्षात ती कलासेवा सुरू करते. त्यात मिळणाऱ्या यशाने व कीर्तीने आपण अण्णांच्या उपदेशातली लक्ष्मणरेषा ओलांडली आहे याची तिला पुसटशी जाणीव राहात नाही.

### लक्ष्मणरेषा ओलांडली अन्....

या नव्या जीवनात तिला निरनिराळे अनुभव येऊ लागतात. व वस्तुस्थितीचे ज्ञान होते. लांबून मोहक दिसणारे हे जीवन किती किळसवाणे आहे याचा साक्षात्कार होतो. पतीबरोबरच मुलांची जी गैरसोय होते ती टोचू लागते. खुद्द माहेरींदेखील तिची पत कमी होते. नाटचसृष्टीत ज्यांच्यावर विश्वास ठेवून ती वावरते, ते मोहनराव, बिंदुमाधव वगैरे विश्वास ठेवण्यास पात्र नाहीत, हे समजते. आपण मर्यादारेषा ओलांडणे योग्य नव्हते, हे समजून येते. संसार आणि कला या संघर्षात ती परत संसाराकडे वळू लागते. 'कलेच्या आनंदापेक्षा संसारातला आनंद मोठा आहे, अशी खात्री झाली माझी' अशी ती कबुली देते. व कालिदासाच्या पत्राला साद देऊन परत एकदा नव्या उमेदीने संसारास लागते. व चुकलेल्या मार्गातून निघून परत सरळ मार्गाने जाउ लागते.

### उत्कर्षबिंदू साधला असता....

या कादंबरीचे बरेचसे श्रेय लेखकाच्य निवेदन शैलीला आहे. सफाईने प्रसंग व व्यक्तिचित्र रेखाटण्याचे सामर्थ्य त्यांच्य लेखणीत आहे. ना. सी. फडके यांच्य शैलीचे संस्कार जाणवतात. लेखनतं व त्यातील सफाई त्याच संस्कारातील वाटते.

रेखाचे लक्ष्मणरेषा ओलांडणे अधिव अपरिहार्य हवे होते. स्वभाव किंव परिस्थिती यांच्यातून निर्माण झालेलं अपरिहार्यता, या कादंबरीत आहे त्यापेक्ष अधिक सुसंगत मांडली गेली असती त संघर्ष अधिक तीव्र झाला असता व तिचे मूल्य वाढले असते. रेखाच्या मानाने कालिदासाच्या मनाचे कंगोरे तीक्ष्ण हवे होते

( पृष्ठ ६६ वर )



अनुक्रमणिका

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JUNE 1968

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4










अनुक्रमणिका